


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका

# आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यास व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें अत्यावश्यक आहेत.

## *तीं त्यांना भरपूर प्रमाणांत मिळतात काय?*




# नवीन ! व्हिम्ग्रॅन्®

## मल्टिपल व्हिटॅमिन्स-मिनरल्स टॅब्लेट्स

व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांच्या अभावामुळें आपल्या कुटुंबियांचे स्वास्थ्य बिघडण्यांची शक्यता असते. आवश्यक तीं व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांच्या अभावामुळें थकल्यासारखें वाटणें, सर्दी होणें, भूक न लागणें, अशक्तपणा, त्वचेचे आणि दातांचे विकार उद्भवणें यांसारख्या तक्रारी सुरू होतात.

अतिशय दक्षतेनें तयार केलेल्या भोजनांत देखील व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यांच्या बाबतींत दुर्लक्ष होण्याचा संभव असतो. अगदीं सत्त्वयुक्त समजला जाणारा आहार देखील समतोल असतोच असें नाहीं. आपल्या नेहमींच्या आहारांत व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांची कमतरता असण्याची शक्यता असते. अशा स्थितींत आपल्या कुटुंबियांच्या स्वास्थ्यास अत्यावश्यक असलेलीं सर्व व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें योग्य प्रमाणांत मिळतात कीं नाहीं याची खात्री कशी करायची?

आपल्या कुटुंबांतील प्रत्येकास त्याच्या आरोग्यास उपयुक्त अशी पौष्टिक सत्त्वें योग्य प्रमाणांत मिळावीं असें आपणांस वाटत असेल तर व्हिम्ग्रॅन्-स्क्विब मल्टिपल् व्हिटॅमिन्स मिनरल्स टॅब्लेट्स रोज एक या प्रमाणांत देण्यास सुरुवात करा. अशा निरोगी संवर्धाचा शुभारंभ आजपासूनच कां करीत नाहीं?

व्हिम्ग्रॅन्मध्यें महत्त्वपूर्ण अशीं अकरा व्हिटॅमिन्स आणि आठ खनिजद्रव्यें यांचा सुयोग्य प्रमाणांत अंतर्भाव करण्यांत आला आहे. लाल रक्तपेशींची वाढ आणि खर्च झालेली शक्ति भरून येण्यास आवश्यक असलेलें लोह, हाडें नि दांत यांच्या मजबूतीसाठीं कॅल्शियम, सर्दीला प्रतिरोध करण्यासाठीं व्हिटॅमिन् सी, भूक उत्तेजित करण्यासाठीं आणि उत्साहवर्धनासाठीं व्हिटॅमिन् बी१२, यांखेरीज आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यास उपयुक्त असलेली अनेक महत्त्वपूर्ण पौष्टिक द्रव्यें व्हिम्ग्रॅन्मध्यें आहेत. व्हिम्ग्रॅन्च्या एका टॅब्लेटला फक्त तेरा पैसे पडतात. आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यरक्षणाच्या दृष्टीनें ही किंमत अत्यल्पच आहे. आजच व्हिम्ग्रॅन् खरेदी करा—रोज व्हिम्ग्रॅन् घेत चला.

# व्हिमग्रॅन्®

## रोज व्हिम्ग्रॅन्ची एक टॅब्लेट म्हणजेच निरोगी स्वास्थ्य.

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

®हा ई. आर. स्क्विब अँन्ड सन्स इन्कॉर्पोरेटेड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे व तो करमचंद प्रेमचंद प्रायव्हेट लि. यांना वापरण्याचें लायसन्स आहे.

Shilpi-SC-256A-Mar






अनुक्रमणिका



# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कलाविलास

सप्टेंबर १९६७ • वर्ष २३ वे • मूल्य १। रु.

## श्रेयनामावलि–



**भारतीय क्रिकेटचा वाजलेला बोऱ्या**

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मत असतातच असे नाही.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay - 4.

# दीपावली

## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५
तारेचा पत्ता DALALART


● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** १६–००

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिन्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# मंदीचा फटका

काय म्हणता ? बाजारात मंदीची लाट उसळली आहे ? कच्चा माल मिळत नाही, म्हणून काही कारखाने बंद पडत आहेत. पुरेसा आटा-मैदा मिळत नाही, म्हणून छोटचा बेकऱ्या तर सोडाच, मोठमोठ्या नामवंत बिस्किट–कारखान्यातही फक्त एकतृतीयांश उत्पादन करणे भाग पडत आहे. तरीही कामगारकपात करणे इष्ट व शक्य नसल्याने नेहेमीचा खर्च व्हायचा तेवढा होतोच आहे. बाजारात वस्तू आहेत, पण गिऱ्हाईक नाही. फ्लॅट्स् आणि मोटारीनाही कोणी पुसेनासे झाले आहे. अहो इतकेच कशाला, कानात आणखी एक गुपित सांगतो. सिनेमावाल्यांनी स्टार-व्हॅल्यूही पार घटविली आहे म्हणे !...

. . . बिच्चारे महाराष्ट्राचे मुख्यमंत्री व त्यांचे सहकारी ! मंदी व पैशांची तंगी यामुळे मलबारहिलच्या 'स्लम एरियात'च रहाणे त्याना भाग पडत आहे ! एव्हाना कुठे बरे... (तोही मुंबईत एक प्रश्नच ! ) बोरिवलीच्या नॅशनल पार्कात 'कुटीर' बांधून नसते का राहिले ? आणि ती कुटिराची कल्पनाही विजयालक्ष्मी पंडित या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय ख्यातीचे नेतेपद लाभलेल्या विदुषीची...

बाकी भारताला यात नवीन ते काय ? कारण दोन हजार वर्षांतील आपत्तींचा इतिहास हेच दर्शवितो. आपापले आपले राज्य, त्यातही आधी आपली चैन मग प्रजेचा विचार. तोच, दुसऱ्या बाजीरावाचा वारसा आम्ही पुढे चालवीत आहोत.

याच नाण्याची दुसरी बाजूही अगदी बघण्यालायक आहे ! समाज कल्याणाचे कंकण बांधलेल्या, दारुबंदीचा ताशा अहोरात्र बडविणाऱ्या आपल्या या महाराष्ट्रात एक तरुण पोरगा येतो. दहा वर्षात हातभट्टीच्या धंद्यावर लक्षावधी रुपये कमावून वयाच्या सव्वतिसाव्या वर्षी आपल्या गांवी (महाराष्ट्राबाहेर) परत जातो. नि जाताना आपल्या व्यवसाय-बंधूंना वडीलकीने आशिर्वाद देतो 'वत्सानो निश्चिंत असा... तरीही आमचे वसंतराव एकतारीवर नशाबंदीची भजने गाण्यातच चूर. दारुबंदीचे फॅड निर्माण झाले नसते तर कोटचावधी रुपयांचे अबकारी उत्पन्न, तसेच त्या कायद्याच्या अंमलबजावणीसाठी होणारा खर्च वांचविण्याचे श्रेय हा दुहेरी व्यावहारिक फायदा कसा बरे मिळाला असता ? मंदीचे एक तरी पाऊल त्यामुळे मागे नसते का पडले ?

ओघाओघाने आठवलेला व प्रसिद्ध झालेला एक किस्सा. . . एकटच्या दिल्ली शहरात (महापालिका परिसर) दरवर्षी ६.६३ लक्ष गॅलन परकीय दारु खपते. हा गतवर्षीचा आंकडा. १९६०–६१ मधे तीच विक्री अवघी तीन लक्ष गॅलन होती. मग तुम्हीच सांगा, इतके मनसोक्त सुरापान केल्यानंतर मंदी येईल का तेजी ? या दोन्ही उदाहरणात विसंगती वाटली तरी त्यात सुसंगतीही आहे. . .

तसलाच हा पावसाळा ! याला काहीच कशी अक्कल नाही ? तो नीटपणे, सातत्याने पडत राहिला तर अमेरिका व इतर राष्ट्रांचे कोटचावधी रुपयांचे धान्य नसते का समुद्रात फेकून द्यावे लागले ? विकत घेतलेले ते धान्य नीट साठवले असते, नासधूस टाळली असती, तर लक्षावधी भारतीय उंदीर-घुशी वगैरे वगैरे तडफडून मेल्या असत्या. आणि तो सारा सत्यानाश उघडचा डोळ्यांनी आपल्या हाताने करता यावा, म्हणून कैक कोटींचा चुराडा करून सबंध देशात उभारलेली अद्ययावत सरकारी कार्यालये, सचिवालये आणि तेथील हजारो अधिकारी व नोकर बेकार नसते का झाले ? ते होऊ नये, म्हणून त्याचे भांडवल करून सत्ताधारी तसेच सत्तेला धरू पहाणारे राजकीय पक्ष आणि पक्षी, व्यापारी, कारखानदार, उद्योगपती यांचे उखळ कसे बरे पांढरे झाले असते ?

एवढ्यासाठीच तर आपण मंदीला आमंत्रण दिले. ती आली. आदरातिथ्यासाठी दिगंत कीर्ति मिळविलेल्या भारतवासियांनी आता काय तिची हकालपट्टी करावयाची ? आणि ती कोण करणार !

—संपादक




अनुक्रमणिका










## स्तुत्य उपक्रम

स. न. वि. वि.

ऑगस्टच्या दीपावली अंकात रा. बाबुराव कामत–वसई ह्यांनी पत्राद्वारे मांडलेले "सारस्वतांची विवाह–समस्या"-संबंधी विचार वाचले. या संबंधी त्यांचे विचार पटण्यासारखे आहेत व अशा रितीने स्थळांची माहिती एकत्र केल्यास व ती प्रसिद्ध झाल्यास सारस्वत समाजातील लोकांना विवाह–समस्या सोडविण्याकरिता नक्कीच फायदेशीर होईल. रा. कामत ह्यांच्या सुचनेनुसार दीपावलीने हे काम हाती घेतल्यास सारस्वत समाज-सेवेचे यश त्यांच्या पदरी पडेल. लेखकाने सुचविल्याबद्दल मी त्यांचे हार्दिक अभिनंदन करतो. कळावे ––

गिरगांव — वि. रा. कोठारी

मुंबई–४

## औचित्यपूर्ण लेख

स. न. वि. वि.

आपल्या दीपावलीच्या जुलै ६७ च्या अंकातील श्री. गोपाळकृष्ण भोबे ह्यांचा श्री. वामनराव देशपांडे यांच्यावरील लेख अगत्यपूर्वक वाचला.

ख्याति पावलेल्या गायक-वादकांबद्दल भोब्यांनी बरेच लिहिले आहे. पण संगीताच्या ह्या दर्दी जाणकाराची ओळख करून देऊन एका अर्थाने त्यांनी रसिकांना संगीतकारांच्या ,ओळीत नेऊन बसविले आहे. वामनरावांची परिचय लेखासाठी निवड करून भोब्यांनी फार मोठे औचित्य दाखविले आहे ह्यात शंका नाही.

या लेखात वामनरावांनी आपल्या 'घरंदाज गायकी' ह्या पुस्तकात व्यक्त केलेल्या मतांबाबत मतभेदाला जागा असल्याचे भोबे यांनी लिहिले आहे. विशेषतः 'अंतरोली' घराण्याबद्दल लिहिताना वामनराव बरेच 'मृदु' आणि अंतर्मुख झालेले वाटतात असे भोबे म्हणतात. मी हे पुस्तक चारपांचदा वाचून काढले आहे. मला स्वतःला वामनराव बडे गुलाम-अलीखाँ किंवा त्यांच्या पतियाळा घराण्याबाबत लिहिताना जेवढे हळुवार झाले आहेत तेवढे 'अंतरोली' घराण्याबाबत झालेले वाटले नाहीत. माझ्या आतापर्यंतच्या वाचनांत ह्या घराण्याच्या श्रेष्ठत्वाबद्दल कुणी संशय घेतल्याचे तरी आले नाही. वामनरावांनी 'रिझर्व्ह बँक ही जशी बँकांची बँक असते तशी समाजातील गायकीच्या दृष्टीने खास सुसंस्कृत वर्गा-करता गायकी म्हणजेच "ट्रुली क्लासिकल' अशी ती (अंतरोली) गायकी राहिली (घरंदाज गायकी पान ६६) असे ह्या गायकीबद्दल लिहिले तर भोब्यांनीहि 'महाराष्ट्राला या गायकीच्या (अंतरोली) बाबतीत तरी अन्य प्रतिस्पर्धी अजून कुणी आढळला नाही' (सात स्वरश्री पान १०४) असे नमूद केले आहे. तरीही श्री. वामनराव यांचे संबंधी श्री. भोबे यानी असे कां लिहावे हे कळत नाही.

याच अनुषंगाने श्री. भोबे यांना एक विनंति करावीशी वाटते. आमच्या सारख्या नवीन पिढीच्या श्रोत्यांना अंतरोली (जयपूर) घराण्याची गायकी, इतर घराण्यांची ऐकायला मिळते तेवढी, ऐकायला मिळत नाही. केसरबाई किंवा मोगुबाई यांचे राज्य संगीत महोत्सवातील गायन वा ध्वनिमुद्रिका एवढाच काय तो अनुभव. पण त्यामुळे त्या गायकीची घाटणी किंवा व्यक्तित्त्व कळण्याऐवजी बरीच प्रश्नचिन्हें मात्र निर्माण झाली आहेत. तीच गोष्ट ग्वाल्हेर–गायकीची. या प्रश्नांची उत्तरे मिळविण्यासाठी 'घरंदाजी गायकी'कडे मी स्वतः अनेकवेळा धाव घेतली आहे आणि कुवतीनुसार त्या गायकीतून व्यक्त होणाऱ्या व जाणवणाऱ्या कूट गोष्टींचा अन्वयार्थ या पुस्तकाचे साह्याने लावण्याचा प्रयत्न केला आहे.

श्री. भोबे यानी म्हटल्याप्रमाणे वामनरावांनी आपल्या पुस्तकातील चर्चा आत्मनिष्ठ वृत्तीने केली आहे, असे क्षणभर गृहित धरले तर त्या सर्व गायकीचा त्रयस्थ वृत्तीतून बुद्धीवादी व तर्कशुद्ध विचार होणे आवश्यक आहे. तसे झाल्यास नवीन पिढीला गायनाच्या आणि त्यातील घराण्यांच्या अनेक कूट प्रश्नांची योग्य उत्तरे मिळू शकतील. श्री. भोबे यांचा या क्षेत्रातील प्रदीर्घ व्यासंग आणि अनुभव लक्षात घेता ते ही जबाबदारी पार पाडू शकतील ?

बांद्रा (पूर्व) —भास्कर उत्तरवार

मुंबई ५१

## 'कीचका'चे वेगळे दर्शन

हल्लीची मासिके चाळण्यापलिकडे त्यांना फारसे वजन नसते या मताचा मी आहे. पण नाटयविषयक काही आढळले तर ते अधाशासारखे वाचून काढतो. जूनपासून सुरू झालेल्या 'कीचक' नाटयाने मात्र मी दीपावलीकडे जरा वेगळ्या तऱ्हेने पाहू लागलो आहे. पण त्या मालिकेत खंड पडला, की अंकातील इतर मजकुराकडे दुर्लक्ष होते. 'कीचक' अखंडपणे दर्शनास यावा ही विनंति.

लश्कर–

–ग्वाल्हेर —विश्वनाथ ग. राजवाडे

## अंतर्मुख बनविणारे लेख

स. न. वि. वि.

ऑगस्ट अंकातील 'मराठी माणूस मार कां खातो ?' व 'मराठी माणसा अंतर्मुख हो' हे दोन्ही लेख खात्रीने विचार करावयाला लावणारे आहेत. बाकी एक खरं. विचार सगळेच करतात हो, पण तसं वागायचं कुणी ?

ओझर

(जिल्हा नाशिक) —महादेव तुपे



# मराठी रंगभूमीवरील

# गंधर्व युग

## एक सोनेरी कालखंड

—के. टी. देशमुख

**नटसम्राट** बालगंधर्वांच्या निधनाने नाटचाचार्य अण्णासाहेब किर्लोस्करानी संयोजिलेल्या संगीत नाटकांच्या भाग्यशाली सुवर्णमयी कालखंडाची आता अखेर झाली असेच म्हणावे लागेल. विष्णुदास भाव्यांच्या परंपरेमधील ताकडधोम नाटचप्रकारातील नाविन्य आणि आकर्षण नाहीसे झाले होते अशा वेळी त्या कलाहीन धांगडधिंग्याला प्रेक्षक कंटाळून गेला होता. सुसंस्कृत समाज आणि इंग्रजी विद्येचा प्रथमत:च संस्कार झालेला नवशिक्षितांचा वर्ग तर करमणुकीच्या या प्रकाराकडे हेटाळणीच्या दृष्टीने पहात होता. समाजातील उच्चभ्रू आणि बुद्धिजीवी वर्गाला सद्‌भिरुचिसंपन्न, सुयोग्य, सुबुद्ध अशी करमणूक उपलब्ध नव्हती. अशा काळात किर्लोस्करांनी मनोरंजनाचे एक नवे दालन उघडले आणि मराठी रंगभूमीला एक नवे नेटके डौलदार रूप बहाल केले. या नवीन संगीत नाटच प्रकारात कथानक, संवाद, पात्रांचे स्वभावपरिपोष, नेपथ्य आणि वेषभूषेत त्यानी आमुलाग्र, अनुरूप असे फेरबदल केले. इतकेच नव्हे तर मराठी नाटचदेवतेला त्यानी संगीताचे एक नवे लेणे चढविले. मराठी नाटचकलेला प्रगतीच्या दिशेने नवे इष्ट असे वळण लागणे अत्यावश्यक आहे, या तळमळीतून किर्लोस्करांच्या 'संगीत शाकुंतल' नाटकाचा जन्म झाला.

### रंगभूमीच्या उत्कर्षाची नांदी

निर्माता म्हणूनही अण्णासाहेबांची योग्यता थोर आहे. नाटच, प्रतिभाशाली कवित्व संगीताची अनुरूप रसानुकूल योजना या गोष्टीबरोबरच स्त्री–पुरुष पात्रांची यथायोग्य अशी निवड आणि परिणामकारक नेपथ्य, वेषभूषा इ. सर्व अंगे त्यांनी कौशल्यपूर्वक हाताळली. मराठी रंगभूमीवर उभारण्यात आलेले हे मनोहर शिल्प क्रांतिकारक ठरले. आजही त्यांच्या 'नाटचकृती दीपस्तंभासारख्या उभ्या असून मार्गदर्शन करीत आहेत हे आपण पहातोच. शाकुंतल नाटकाच्या पहिल्या प्रयोगाने सामान्य प्रेक्षक तर दिपून जाऊन विस्मित झालाच. परंतु समाजातील उच्च संस्कृतीचा, उच्च आवडीनिवडीचा, चोखंदळ वृत्तीचा प्रेक्षक मराठी रंगभूमीकडे आकर्षित झाला तो कायमचाच. रंगभूमीला जो उत्कर्षाचा काळ पुढे येणार होता त्याची संगीत शाकुंतल ही नांदी होती.

नव्या दिशेने करण्यात आलेल्या शाकुंतल नाटकाच्या प्रयोगांचे अपूर्व स्वागत झाल्यानंतर किर्लोस्करानी मोठ्या हुरुपाने आपल्या किर्लोस्कर नाटक मंडळीची स्थापना केली. किर्लोस्कर कंपनीच्या नाटकाला सहकुटुंब सहपरिवार हजर रहाण्यात मराठी रसिक प्रेक्षक धन्यता मानू लागला. राजकारण आणि रंगभूमि हे दोन त्याचे आवडीचे










विषय होऊन बसले. लोकमान्य टिळक आणि किर्लोस्कर कंपनी ही त्यांची श्रद्धास्थाने झाली. राजाश्रयाखाली जोपासल्या गेलेल्या नाट्यकला आणि गायनकला इथे लोकगंगेस येऊन मिळाल्या. महाराष्ट्रात नाट्यकला आणि संगीतकला या विद्यांची वाढ होण्यासाठी अनुरूप अशी भूमि तयार करण्याची फार मोठ्या स्वरुपाची कामगिरी किर्लोस्कर कंपनीने करून दाखविली. पुढे उदयास आलेल्या गंधर्वयुगात या कलांच्या उत्कर्षाचा परमोच्च बिंदु साधला गेला. किर्लोस्कर कंपनीने मराठी रंगभूमीवरील एका वैभवशाली पराक्रमी कालखंडाचा पाया घातला तर तिच्याच अपत्याने–गंधर्व-नाटक मंडळीने मराठी रंगदेवतेच्या कीर्ति-मंदिरावर सोन्याचा कळस चढविला.

१९०५ साली गुरु द्वादशीच्या सुमुहूर्तावर बालगंधर्वांनी किर्लोस्कर कंपनीत प्रवेश केला. त्यांनी प्रथम केलेली शकुंतलेची भूमिका रसिकाना स्वागतार्ह वाटण्याइतकी यशस्वी ठरली. या यशामध्ये देवलमास्तरांच्या खास तालमीचा वाटा होता. शंकरराव मुजुमदारांशी मतभेद होऊन 'पुन्हा कंपनीत पाऊल ठेवणार नाही!' या प्रतिज्ञेवर शीघ्रकोपी देवल किर्लोस्कर कंपनीमधून निघून गेले. त्यानंतरच्या सौभद्र, मृच्छकटिक, गुप्तमंजूषा, नाटकातील बालगंधर्वांच्या सुभद्रा, वसंतसेना, आणि नंदिनी या भूमिका चितुबुवा गुरव आणि गणपतराव बोडसांनी बसवून घेतल्या. त्या प्रेक्षकांनी पसंतही केल्या. भाऊराव कोल्हटकरांची जागा कधीच भरून निघावयाची नाही, ही त्यांची मनोभावना! बालगंधर्व आपल्या सुंदर दर्शनाने आणि गोड गायनाने प्रेक्षकांवर छाप मात्र जरूर टाकीत. गणपतराव बोडसाना त्यांची गाण्याची पद्धत 'सुंदर व ढंगदार तालसुरात पक्की वाटली' असे त्यानी म्हटले आहे. बालगंधर्वांच्या भूमिकेतील घोटून शिकविलेला अभिनय आणि यांत्रिक हालचाली चाणाक्ष रसिकांच्या नजरेतून सुटल्या नव्हत्या.

## प्रेमशोधन नाटकाने लावलेला शोध

श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या प्रेमशोधन नाटकाच्या तालमी घेण्याचे काम नाट्याचार्य काकासाहेब खाडिलकरांच्याकडे आले तेव्हापासून बालगंधर्वांच्या स्त्रीभूमिकांची मोहिनी प्रेक्षकांवर दिवसेंदिवस अधिक पडू लागली. प्रेमशोधनमधील 'इंदिरा' या नायिकेच्या भूमिकेचा अभिनय कौशल्याबद्दल विशेष गाजावाजा होऊ लागला. गणपतराव बोडस म्हणतात, 'इंदिरेच्या साध्या वेषात नारायण मोह पाडण्याइतका सुंदर दिसे. आम्हा दोघांची कामे उत्कृष्ट होत. त्यांतही पांचव्या अंकातील कंदन-इंदिरेचा प्रवेश बहारीचा होत असे'. बालगंधर्वांच्या अनन्यसाधारण लोकप्रियतेची गंगा इथूनच प्रकट झाली. प्रेमशोधन नाटकाच्या यशाने बालगंधर्वांच्या नांवलौकिकात एकदम भर पडली असली तरी ह्या नाटकाच्या निमित्ताने त्यांचे सुप्त कलागुण नाट्याचार्य खाडिलकरांच्या सूक्ष्म नजरेत भरले म्हणून त्यांचा खरा अधिक फायदा झाला. महाराष्ट्र नाटक मंडळीसाठी समस्याप्रधान तेजस्वी उग्र प्रखर नाटके लिहिणारे, बसविणारे, गाजविणारे नाटककार अशी खाडिलकरांची तोवर ख्याती होती. बालगंधर्वांसारखा सुंदर दिसणारा गोड गळ्याचा नटशिष्य मिळाला म्हणून खाडिलकरांनी किर्लोस्कर कंपनीसाठी आपले पहिले संगीत नाटक–'**मानापमान**' लिहावयास घेतले. खाडिलकर–बालगंधर्व ही गुरुशिष्यांची युति मराठी रंगभूमीवर युगप्रवर्तक ठरून अमर झाली. गंधर्वयुग अवतरण्याची पार्श्वभूमि अशी तयार होत होती.

## सुशिक्षित 'महिले'चें प्रभावी दर्शन

बालगंधर्वांच्या प्रेमशोधन नाटकातील इंदिरेच्या भूमिकेचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्टय आढळून येते. सुशिक्षित समाजामध्ये आणि विशेषतः कॉलेजच्या विद्यार्थ्यांमध्ये प्रेमशोधन नाटक खूप लोकप्रिय झाले. किर्लोस्करी नाटकांची पौराणिक चाकोरी कोल्हाटकरांनी जुनी ठरवून टाकून दिली होती. नाटकाचे कथानक कल्पनारम्य होते. प्रयोग बहारीचा होत होता. नाटक नवे असल्याने बालगंधर्वांची तुलना जुन्या नटाशी ठरविण्याचा प्रश्न अप्रस्तुत ठरणार होता. इंदिरेची भूमिका यशस्वी ठरली होती. आणि बालगंधर्वांविषयीचे आकर्षण वाढीस लागलेले होते. गोविंदराव टेंबे म्हणतात, "स्त्री शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळे समाजातील तरुणींच्या वेषभूषेत, भाषेत आणि हालचालीत एक प्रकारचा नवीन खेळकरपणा आला होता. त्यांच्या चेहेऱ्यावर शिक्षणाची प्रभा पसरू लागली होती. बालगंधर्वांच्या त्या वेळच्या चेहेऱ्याचा घाट, हालचालींची लकब म्हणजे अशा आधुनिक तरुणींचा तंतोतंत नमुना!" सुसंस्कृत समाजाला बालगंधर्व हे आपल्या मुलीबाळीसारखे दिसत आणि त्यामुळे



**कॉलेज तरुणाना बेडेपिसे करणारे हे सौंदर्य!**



**असा धैर्यधर पुन्हा झालाच नाही ! नानासाहेब जोगळेकर आणि बाल गंधर्व**

वयस्करांना आणि समवयस्कराना त्यांच्या विषयी एक प्रकारचा विशेष आपलेपणा वाटे. तरुण पिढीच्या नव्या दृष्टिकोनाचे समाधान करण्याची पूर्ण पात्रता ईश्वराने त्यांच्या बोलण्याचालण्यात आणि चेहेऱ्यातहि ठेवली होती. आणि तीच जादू त्यांच्या संगीतातहि होती !"

## वेडावलेले कॉलेज-विद्यार्थी

किर्लोस्कर कंपनीच्या पुण्याच्या मुक्कामात नाटकाचे निम्म्याहून अधिक उत्पन्न कॉलेजच्या विद्यार्थ्यांकडून होऊ लागले. गोविंदराव म्हणतात, "डेक्कन कॉलेज म्हणजे बादशाही कॉलेज ! बालगंधर्वांवर डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी बेहद्द खूष ! त्यांची वरचेवर होणारी गाणी, त्यांना निरनिराळ्या क्लबातून होणाऱ्या मेजवान्या, बक्षिसे फोटो इत्यादिकांचा अव्याहत वर्षाव कॉलेजातून चालू असे! नाटकी लोकांना आणि त्यातून स्त्रीपार्टी नटाला समाज त्यावेळी जवळ जवळ तुच्छतेन वागवीत असे. तथापि बालगंधर्वांच्या निष्पाप, लाघवी आणि गोड वागणुकीमुळे समाजाचा दृष्टिकोण निवळू लागला होता. त्या वेळची त्यांची भक्ति पुढे पंचवीस तीस वर्षांपर्यंत नटवर्गाचा सामाजिक दर्जा वाढविण्यास कारणीभूत व उपयुक्त ठरली. बालगंधर्वांच्या गुणामुळे हळूहळू त्यांच्या स्वतःविषयी नव्हे तर एकंदर नटवर्गाविषयीची अनिष्ट भावना समाजातून लुप्त होऊ लागली !"

निरनिराळ्या कॉलेजांतील हा विद्यार्थीगण व्यवसायानिमित्त पुढे अमरावती नागपूरपासून बेळगांव हुबळीपर्यंत सर्वत्र पांगला गेला खरा परंतु अंतःकरणात बालगंधर्वांविषयी श्रद्धायुक्त प्रेम घेऊन ! हा गंधर्व कंपनीचा रसिक प्रेक्षक वर्ग ! उभ्या हयातीत बालगंधर्वांशी इमानाने एकनिष्ठ राहिला.

## नवी स्त्री

किर्लोस्कर कंपनीतील बालगंधर्वांचे

हे आकर्षण गंधर्व कंपनीच्या स्थापनेनंतर झपाट्याने वाढीस लागले. स्त्री सौंदर्याचा आदर्श आणि नीटनेटक्या तरतरीत परंतु शालीन स्त्रीचा आदर्श म्हणजे बालगंधर्वांचे रंगभूमीवरील दर्शन असा पुरुष प्रेक्षकाप्रमाणेच स्त्री प्रेक्षकांचाहि पक्का ग्रह झाला. त्या काळची जुनी अशिक्षित स्त्री उंची वस्त्रातहि गबाळी वाटे. त्यातहि पुन्हा अलंकारांची गर्दी! बालगंधर्व सादर करीत ती नवी स्त्री मोजक्या अलंकारात रंगभूमीवर प्रवेश करी. तिच्या पोषाखात टापटीप–नेटकेपणा असे. तिच्या केशरचनेत सौंदर्य दृष्टि होती. आणि तिच्या हालचालीतील मनोहर डौलाने लाडिकपणाने प्रेक्षकांच्या चित्तवृत्ती उल्हसित होत. म्हणून बालगंधर्वांच्या पोषाखाचे, संभाषण पद्धतीचे हावभावाचे केशरचनेच्या पद्धतीचे अनुकरण करण्याची फॅशन स्त्री प्रेक्षकांनी आवडीने उचलली. बालगंधर्वांनी नव्या पद्धतीचा शालू रंगभूमीवर आणला किंवा नव्या पद्धतीची जॉर्जेटची साडी दाखविली किंवा ब्लॉऊजमध्ये नवी फॅशन केली की तत्काळ त्या त्या व्यापाऱ्यांच्या दुकानात गिऱ्हाईकांची गर्दी उसळणार हे ठरून गेले होते. पुरुष प्रेक्षकहि याबाबत मागे राहिले नाहीत. त्यांनी बालगंधर्वांना डोक्यावर घेतलेच होते परंतु जेव्हा गंधर्व कंपनी निघाली तेव्हा तिलाहि लोकप्रिय करून डोक्यावर घेतले. उच्छृंखल अशा वयात कॉलेज विद्यार्थ्यांना बालगंधर्वांचे केवढे आकर्षण होते हे सांगताना दादा लाडू म्हणतात, "नारायणरावांचे निरनिराळ्या स्त्री भूमिकातील निरनिराळ्या प्रसंगीचे फोटो काढून मी नाटकगृहात विक्रीस ठेवीत असे. पोस्टकार्डाच्या आकाराच्या छायाचित्राची किंमत अर्धा आणा आणि कॅबिनेट साईझची किंमत चार आणे

ठेविली होती. त्यावर मला दर नाटकाच्या वेळी पंधरा ते वीस रुपयेपर्यंत प्राप्ति होत असे. काही श्रीमंताच्या मुलांना आपले स्वतःचे गंधर्वाप्रमाणे स्त्री वेषातले फोटो काढवून घेण्याची फार हौस असे. तसले फोटो काढायला मी चौपट दर घेत असे. कारण त्या षोकिनाना स्त्री-वेषात मलाच सजवावे लागत असे !"

## वारकरी सांप्रदायासारखाच भाविक प्रेक्षक

बालगंधर्वांचे आकर्षण पुढे पुढे सर्वव्यापी होऊन समाजातील सर्व थरांतील प्रेक्षकांना त्यांच्या भूमिका आणि त्यांचे गायन ही एक अतीव जिव्हाळ्याची, कौतुकाची बाब होऊन बसली. मराठी रंगभूमीवरील दुसऱ्या कुणाहि कलावंताच्या वाटेस इतकी अमाप लोकप्रियता कधी लाभली नाही. बालगंधर्व आणि त्यांच्या गंधर्व नाटक मंडळीचा नांवलौकिक आणि कीर्ति इतकी दूरवर पसरली होती की १९२७-२८ सालातील वऱ्हाडच्या दौऱ्यात गंधर्व नाटक मंडळी वऱ्हाडातील सधन शेतकरी वर्गाच्या आश्रयाखाली दीडदोन लाखाच्या कर्जातून सहज मुक्त होऊ शकली. पुण्या-मुंबईकडील प्रेक्षकांची तर गोष्ट बोलावयासच नको. गंधर्व कंपनीच्या मुक्कामाच्या जाहिराती लागल्या की, पंढरपूरला जाणाऱ्या भाविक वारकऱ्याप्रमाणे प्रत्येकाची अगदी धांदल उडून गेलेली असावयाची. वसंत शांताराम देसाई म्हणतात, "अमक्याचे नाटक पाहिले नाही तर समाजात आपण अनद्यावत ठरू असे एखाद्या नटाबद्दलचे वेड बहुजनसमाजात निर्माण होणे ही त्याच्या यशाची पराकाष्ठा समजली पाहिजे ! असे वेड रसिक समाजाला बालगंधर्वांनी लावले होते."

बालगंधर्वांचे हे वेड केवळ मराठी माणसालाच लागले होते असे नव्हे तर इतर प्रांतीय रसिक सुद्धा या वेडात मराठी माणसाबरोबर वेहोषीने सामील होत होते. देसाई म्हणतात, "गंधर्व मंडळीचा प्रेक्षकवर्ग इतर कंपन्यापेक्षा अधिक संपन्न आणि अधिक व्यापक होता. गजांत लक्ष्मीत लोळणारे गुजराती, भाटिये, खोजे, आणि मुलतानी, नामांकित न्यायदेपंडित आणि आरोग्य पंडित, परगांवांहून आलेले षोकी मुशाफीर आणि विश्वविद्यालयांतील गुजराती आणि महाराष्ट्रीयच नव्हे तर मद्रासी विद्यार्थीही, अशा प्रेक्षकांनी सदैव तुडुंब भरलेल्या रंगमंदिरांत स्त्रीप्रेक्षकांचा भरणा 'डोळ्यात भरण्याजोगा' असे."

## गंधर्वांचे नाटक—स्वमरंजन

गंधर्व नाटक मंडळीचा 'कॉस्मॉपॉलिटन' प्रेक्षक वर्ग म्हणजे आंतर भारतीय कला स्नेहसंमेलन ! बालगंधर्वांच्या निधनानिमित्त मुंबईच्या साहित्य मंदिरात भरलेल्या शोकसभेत मुंबई महापालिकेचे डेप्युटी कमिशनर श्री. शास्त्री आपली श्रद्धांजली वहात असताना म्हणाले, "आमच्या आंध्रप्रांतात बालगंधर्वांइतकी प्रचंड लोकप्रियता कोणच्याच गवयाने मिळविलेली नव्हती. त्यांच्या गाण्याच्या ग्रामोफोन रेकार्डस् आमच्या अगदी लहानपणापासून आवडत्या. शब्दांचा अर्थ समजला नाही तरी त्यांच्या गायनाची जादू इतकी विलक्षण की आमच्याकडे शेकडो घरांत बालगंधर्वांच्या रेकार्डसचा संग्रह मोठ्या आवडीने केलेला आढळून येत असे. इतकेच नव्हे तर आमच्या आंध्रप्रांतीय कलावंताहूनहि बालगंधर्वांच्या रेकार्डस्‌ची विक्री किती तरी पटीने अधिक होई. आमची वडिलधारी माणसे बालगंधर्वांची नाटके पहाण्यासाठी म्हणून पुण्यामुंबईकडे दौरे काढीत. माझ्या लहानपणी माझ्या मनांत मी जे मनसुबे रचीत असे त्यामध्ये वडिलधाऱ्या माणसाप्रमाणे मीहि मुंबईस जाऊन बालगंधर्वांचे नाटक पहातो आहे अशी गोड कल्पना नेहमी



**उमेदवारीच्या काळामधील भावी यशाचे चिन्ह —सरोजिनी ( मूक नायक ).**



**किर्लोस्कर कंपनीत येऊन दाखल झालेला नारायण श्रीपाद राजहंस**



अनुक्रमणिका

करीत असे. पुढे हा योग खरोखरीच माझ्या आयुष्यात आला त्यावेळी बाल-गंधर्व उतार वयाकडे झुकले होते. परंतु त्यांच्या अभिनयाचा आणि गायनाचा माझ्यावर परिणाम झाला."

बालगंधर्वांच्या पदांच्या रेकार्डस् संग्रही असणे हे महाराष्ट्रामध्ये सुद्धा एक सुप्रतिष्ठितपणाचे लक्षण मानले जात होते. मराठी माणसावर गंधर्व कंपनीच्या नाटकाचा एक फार खोल असा ठसा उमटून राही. बालगंधर्वांचे सुंदर दर्शन, गोड अभिनय आणि स्वर्गीय गायन या अपूर्व अशा त्रिवेणी संगमामुळे एका मोह-मयी नगरीत संचार केल्याचा भास रसिकाच्या अंत:करणात होत राही.

## साक्षात् शारदेचा दरबार

बालगंधर्वांच्या आजूबाजूला उभा असणारा नटवर्गही अव्वल दर्जाचा असावयाचा. नटश्रेष्ठ गणपतराव बोडस, पंढरपूरकर-बोवा, विनायकबोवा पटवर्धन, मास्तर कृष्णराव, रघुवीर सावकार, शंकरराव सरनाईक, माधवराव वालावलकर, गंगाधरपंत लोंढे, श्रीपादराव नेवरेकर, सद्‌भाऊ रानडे, देवधर आणि भांडारकर अशा मौल्यवान नटरत्नांच्या वेळोवेळी झालेल्या संचाला गंधर्व कंपनीचे कोंदण अगदी शोभून दिसे. मखमलीचा पडदा, रंगमंचावर अंथरलेला भला मोठा भरजरी मखमली गालिचा, उंची भरजरी वस्त्रे, शेले, शालू, अलंकार, सोन्या-चांदीचे मुकूट, शस्त्रास्त्र आणि कलापूर्ण देखावे—कलामहर्षि बाबूराव पेंटरांच्या

**या लेखातील छायाचित्रे श्री. के. टी. देशमुख यांच्या मराठी रंगभूमि संशोधन चित्रसंग्रहामधून**

कुंचल्यातून खाली पृथ्वीवर उतरलेली गंधर्व नगरी! केशवराव कांबळे आणि कादर बक्ष यांची ऑर्गन सारंगीची साथ आणि तबल्यावर अहमद जान तिरखवाँ! विनायकबोवा पटवर्धन आणि कृष्णा-मास्तरांचा साथवाल्याबरोबर लढला जाणारा श्रवणीय अटीतटीचा सामना तर बालगंधर्वांचे साथीशी एकजीव झालेले अमृतमय गायन—सारे कलाधुंद वातावरण! गानमहर्षि अलादियाखाँ-साहेब म्हणत की मला गाणे ऐकण्याची इच्छा झाली तर मी गंधर्व कंपनीच्या नाटकाला जातो आणि बालगंधर्वांचे गाणे ऐकतो! तर मग साधासुधा संसारी गानलुब्ध रसिक मग तो मराठी असो गुजराती असो वा मद्रासी असो—बाल गंधर्वांच्या गायनाने तो वेडापिसा व्हावा यात नवल ते काय?

महाराष्ट्राची संगीतातील रसिकता सिद्ध झाली आहे. अनेक खानदानी मुसल-मानी गवई उत्तरेकडून येऊन महाराष्ट्रात स्थाईक झाले. मराठी रसिकाची मन-पसंत दाद मिळते म्हणून त्यानी राजाश्रय देखील झुगारून दिला होता. महाराष्ट्रा-तील संगीतकलेच्या सर्वांगीण उत्कर्षाला अनेक थोर नामवंत कलावंतांचे परिश्रम कारणीभूत झाले परंतु महाराष्ट्रात शास्त्रीय संगीताची आवड किर्लोस्कर कंपनीने रुजविली हे मान्य व्हावयास हवे. नानासाहेब जोगळेकरांच्या प्रेरणेने गुरुवर्य भास्करबुवा बखले यांच्या मार्ग-दर्शनाखाली भारत गायन समाजाची स्थापना झाली. गंधर्व कंपनीच्या कार-कीर्दीत विद्यालयाच्या मदतीकरिता नाटके जलसे करण्याचा प्रघात होता. गु. बखले-बुवा, मास्तर कृष्णराव आणि बालगंध-र्वांची खास बैठकीची गाणी घडवून आण-ण्याची नित्य आणि नैमित्तिक कामगिरी वेगवेगळ्या गांवी अनेक गायन क्लास करून दाखवीत होते. पुढे पुढे मास्तर कृष्णरावांचा जलसा ही एक अवीट अशी मेजवानी ठरली. बालगंधर्व मोठ्या संतो-षाने त्याना हव्या त्या सवलती देत असत आणि आपल्या गुरुचे गाणे पुढे चालवीत आहेत म्हणून धन्यता मानीत. पंढरपूर-करबोवा, मास्तर कृष्णराव, विनायकबुवा पटवर्धन अशा गुणी संगीत कुशल नटांचा संग्रह करून गंधर्व कंपनीचा नाट्यप्रपंच बाल गंधर्वांनी मोठ्या अभिमानाने चालविला.

## एक लहानसे टुमदार संस्थान

"गंधर्व मंडळी म्हणजे, लहानसे टुमदार संस्थानच आहे" रत्नाकर मासिकाच्या १९३१ सालच्या खास गंधर्व अंकात सांगून विनायक बुवा पटवर्धन पुढे म्हणतात, "मंडळींना उत्तम वागविणे मंडळींचे अगत्य व गुणग्राहकता हे तिन्ही गुण श्री. बाल गंधर्व यांच्या अंगी वसत असल्याने कोणीही गुणी मनुष्य कंपनीतून नाखूष होऊन जात नाही.

आपल्याबरोबर काम करणारी मंडळी नीटनेटकी दिसावीत याबद्दल श्री. बालगंधर्व फार दक्ष असतात. जरीचे किंवा रेशमी कपडे आपणच वापरतात असे नाही तर आपल्या बरोबरीच्या सर्वांना चांगला कपडा घेऊन त्याना कोणत्याही तऱ्हेची न्यूनता ते कधीच ठेवीत नाहीत. आपण तेवढे चांगले कपडे वापरावयाचे व इतर मंडळींना कसले तरी कामचलाऊ कपडे करणे

(पृष्ठ ५८ पहा)



# फॉस्फोमिन-



अधिक उत्साह देते.



भूक वाढविते. जोम वृद्धिंगत करते.



शरीराची रोग-प्रतिकार-क्षमता वाढविते

खरोखर!...

फॉस्फोमिन म्हणजे घरकुलांतील आरोग्याचे कारंजे!




व्हिटॅमिन बी कॉम्प्लेक्स आणि विविध ग्लिसरोफॉस्फेटस्‌युक्त उत्तम फलास्वाद असलेले हिरव्या रंगाचें टॉनिक—फॉस्फोमिन

**SQUIBB® TTT®**

® हा ई. आर. स्क्विब अॅण्ड सन्स, इन्कॉर्पोरेटेड, यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे व करमचन्द प्रेमचन्द प्रायवेट लि. यांना तो वापरण्याचे लायसन्स आहे

SARABHAI CHEMICALS

Shilpi SC 50 A/67 Mar






अनुक्रमणिका

जयपूर घराण्याचे रसिले गायक



# पं. वामनराव सडोलीकर

—चित्तरंजन घोटीकर

**राशिनकर वकिलांच्या वाड्यासमोर शाळेत जाणारी एक वामन मूर्ति थबकत असे.... नित्य नेमाने.... बायाक्कांच्या सुरांनी त्याचे पाय तेथेच खिळत—मग लागे ब्रम्हानंदी टाळी. बायाक्कांचा रियाज संपल्यावर मग स्वारी भानावर येऊन शाळेत असे व शिक्षकांची बोलणी व मिळालेली शिक्षाही मुकाटपणे भोगत असे. त्याच वामनमूर्तीने जयपूर घराण्याचे नांव अजरामर केले....**

**घराणेदार** शास्त्रीय संगीत नि मराठी नाट्य-संगीत या मराठी मनाला रिझविणाऱ्या कलेच्या दोन्ही डगरीवर सफाईदार-पणे कसरत करून, समतोल साधून, यशस्वितेची ध्वजा फडकाविणारा जयपूर घराण्याचा प्रतिथयश रसिला गायक म्हणून पं. वामनराव सडोलीकर यांच्याकडे बोट दाखविता येईल. अवघड जयपूर गायकीची सच्ची तालीम लाभलेल्या नि जात्याच निर्मळ, खुल्या, पल्लेदार नि गोळीबंद आवाजाची देणगी मिळालेल्या वामनरावांचा पिंड १९१६ सालातल्या कोल्हापूरमधील धुंदकारक गायकीच्या वातावरणात पोसला गेला. महाराष्ट्रातील संगीताच्या या पंढरीमध्ये स्वर-लयींच्या श्रवणीय वर्षावानी १९१६ साली तेथील रसिकजनता न्हाऊन निघाली होती. महाराष्ट्राच्या संगीताच्या या माहेरघरी नादमधुर सुरेल्या संगीताचे, देहभान हरपून टाकणाऱ्या लयकारीचे नि पांडित्यपूर्ण प्रतिभाशाली गायकीचे तडाग काठोकाठ भरून वाहत होते. महाराष्ट्राचे हे "लखनौ" १९१६ सालात रसिल्या स्वर-पुष्पांच्या बरसातीने धुंद झाले होते.

वामनराव कोल्हापूरात लहानाचे मोठे झाले तो काळ नामवंत गायक-गायिकांनी दुमदुमून टाकला होता. खानदानी गायकीने कोल्हापूर त्या काळी भारतात गर्जत होते. भारतीय संगीताला ललामभूत झालेल्या त्या गानश्रेष्ठींची नुसती यादीच कोणाहि रसिकाला आदराने मान लववायला लावील. जयपूर घराण्याचे गानसूर्य अल्लादियाखाँसाहेब, त्यांचे बंधू हैदरखाँसाहेब, अल्लादियांचे ख्यातनाम चिरंजीव भूर्जीखाँसाहेब, मंजीखाँसाहेब व नसिरुद्दिनखाँसाहेब, नाणावलेले पखवाजीये सावळेबुवा, बापूराव दिंडे व बापूराव शाळिग्राम, तसेच सकवारबाई, अल्लादियांचे पट्टशिष्य गोविंदराव शाळिग्राम, पट्टशिष्या तानीबाई घोरपडे, गोखले घराण्याचे सदाशिवराबुवा गोखले, हैदरखांच्या शिष्या लक्ष्मीबाई जाधव (बायाक्का), रसिकश्रेष्ठ गोविंदराव टेंबे, करवीर गायन-समाज, देवलक्लब, इत्यादींनी आपल्या कलाविष्काराचे संस्कार वामनरावांच्या रसिल्या बुद्धीवर तेव्हाच केले होते. या महारथींच्या कलेवर त्यांचा पिंड किशोरावस्थेपासूनच पोसला गेला. आपला जीवनपथ स्वरलयींच्या पुष्पांनी खच्चून भरला आहे ही तीव्र

जाणीव वामनरावाना कोवळया वयातच झालेली दिसते. त्यांच्यातील उपजत गानकलेला उपरिनिर्दिष्ट संगीतमय वातावरण आकार देऊ लागेल. जिवाचे रान करून ते कोल्हापूरातील मैफली ऐकू लागले नि 'करवीर गायनसमाज' नि 'देवल क्लब' यांचे उंबरठे झिजवू लागले.

वामनरावांचे गानवेड नि तीव्र आकलन शक्ति त्यांच्या बाल्यावस्थेतच दृग्गोचर होऊ लागली होती. मुलाचे पाय पाळण्यात दिसावेत, त्याप्रमाणे वामनरावांची गानलुब्धता नि रसिली जिज्ञासू प्रज्ञा त्यांच्या शालेय जीवनातच प्रतीत होऊ लागली होती. लहानपणी मराठी शाळेत वेळेवर पोहोचून 'वक्तशीरपणाचा दाखला' मिळविण्याकरिता अर्धी विजार घालून, गळयात दप्तर अडकवून चपलांचे सटक फटक आवाज करीत कोल्हापूरच्या रस्त्यावरून धावणारा, इतर शाळकरी विद्यार्थ्यांबरोबरचा छबकडा वामन, राशिनकर वकिलांच्या घरासमोर अनाहूतपणे खाड्‌कन थांबत असे; शाळेत वेळेवर पोहोचायचे विसरून जात असे; नि समोरच्याच घराच्या माडीवरून प्रकाशाच्या झोताप्रमाणे वाऱ्याच्या झुळकीबरोबर बाहेर पडणारे निर्मळ व विलक्षण नादमधुर स्वर ऐकत गोंदाने चिकटविल्याप्रमाणे, रस्त्यावर उभा रहात असे. जयपूर घराण्याच्या बडोदा दरबारच्या गायिका श्रीमति लक्ष्मीबाई जाधव (बायाक्का) त्यावेळी आपल्या माडीवरील दिवाणखान्यात रियाज करीत बसत नि त्यांचा मुलायम व मखमली कंठनाद छोटया वामनला मोहिनी घालीत असे. त्या स्वर-किन्नरीचा रियाज रस्त्यावर, पुतळयाप्रमाणे निश्चल उभे राहून, वामनराव ऐकत असत. मग त्या समाधीतून जागृत होऊन शाळेच्या दिशेने धूम पळत जाऊन, शिक्षकांच्या खदिरांगाराप्रमाणे भासणाऱ्या डोळयासमोर भयभीत नजरेने लटपटत उभे रहात नि त्यांची तामसी बोलणी निमूटपणे ऐकत व दिलेली शिक्षा भोगीत असत. तसेच, संध्याकाळी आईने दिलेले लोणीवाल्याचे पैसे देण्याचे विसरून, करवीर गायन-समाजातली अल्लादियाखाँची एखादी मैफल ऐकून, रात्री दोन वाजता घरी परत येत. किशोरावस्थेत शिक्षकांची बोलणी खाऊन निर्ढावलेले वामनराव शालेय शिक्षणात कधीच रमले नाहीत. तथापि उपजत गायकीची, गायकीतल्या सूक्ष्म बारकाव्यांची नि पल्लेदार खुल्या आवाजाची देणगी जन्मतःच घेऊन आलेले वामनराव, शालेय शिक्षणात रमले नाहीत, तरी प्रतिथयश गायक म्हणून जयपूर घराण्याच्या अवघड गायकीची ध्वजा स्वगुणवत्तेवर ते आज उंच फडकावीत आहेत. आपल्यातल्या उपजत गानगुणांना नि संगीत ज्ञानाला त्यानी बेडर कर्तृत्वाची, अहर्निश रियाजीची नि गुरु-श्रद्धेची जोड देऊन, जयपूर घराण्याचा एक रसिला कलावंत म्हणून आज विलोभनीय कीर्ति मिळविली आहे.

सामान्य मध्यमवर्गीय मराठी कुटुंबातल्या कर्त्यासवरत्या **सनातनी वडिलधाऱ्या मंडळींची, आपली मुले कशी निपजावी याबद्दलची जी जुनी कल्पना असते तीच वामनरावांच्या वडिलांची असल्यास नवल काय ? अभ्यासाकडे दुर्लक्ष करून आपला वामन**

**पं. वामनराव सडोलीकर यांची एकसष्ठी १९ सप्टेंबर रोजी आहे. परमेश्वर त्याना दीर्घायुरारोग्य देवो हीच प्रार्थना !**

दिवसभर गात असतो नि गाणाऱ्या मंडळीत रमतो, हे लक्षण ठीक नव्हे, हे त्यानी आपल्या जुनेऱ्या चष्म्यातून हेरले होते. वामनने बी. ए., एम्. ए. व्हावे, पाकीटावर स्टँप चिकटवावा तसे सरकारी नोकरीत चिकटावे, लग्न करून नेटका प्रपंच करावा, ही जाणीव वामनरावाना वरचेवर करून देण्यात येऊ लागली. पण पालथ्या घडयावरील पाण्याप्रमाणे ही बोलणी वाया जाऊ लागली. शास्त्रीय संगीताची न दबली जाणारी उर्मी वामनरावाना अस्वस्थ करू लागली. जेमतेम इंग्रजी पांचवीची सम गाठून त्यानी वामनराव पाध्ये यांच्या "गांधर्व महाविद्यालयात" नांव दाखल केले. तन व मन मात्र अल्लादियाखाँ, भूर्जीखाँ, मंजीखाँ नि गोविंदराव टेंबे यांच्या भोवतीच घुटमळत होते.

१९२० मधे "गांधर्व महाविद्यालयाच्या" मुंबईच्या परिक्षेत कोल्हापूरचे बाबूराव जोशी पहिले नि वामनराव दुसरे आले. चांगलं चुंगलं गाणं आत्मसात् करण्याची जिद्द नि तळमळ वाढतच होती. कोल्हापूरातील गानलुब्ध वातावरण अतिशय पोषक होतं नि त्याना नकळत आकार देत होत; अत्यंत श्रेष्ठ कलावंतांचा सातत्यानी सहवास घडत होता नि त्या महारथींच्या प्रतिभाशाली कलेचे संस्कार प्रत्यही रक्तात भिनत चालले होते.

१९२१ मधे वामनराव मुंबईस दाखल झाले; "गांधर्व महाविद्यालयाची" पायरी चढले नि १९२४ मधे ती पायरी उतरले; ते ताल, लय, आलापचारी, लयकारी उत्तम, बिलंपत इ. ची बेगमी बरोबर घेऊनच. त्या काळात पं. विष्णु दिगंबरांचे "गांधर्व महाविद्यालय" म्हणजे गायनाचे एक विद्यापीठच बनले होते; गानेच्छु छात्रांचे फार मोठे आकर्षण ठरले होते; संगीत विद्येचे प्रचंड भांडार होते. १९२१ ते १९२४ या तीन वर्षात वामनरावानी पं. विष्णू दिगंबरांची खास तालीम घेतली. दैव चालत आले होते नि वामन हातातून चालला म्हणून घरांतील मंडळी नाराज होत होती.

तथापि, चरितार्थाची व्यवस्था करणे आवश्यक होते. गुरुदक्षिणेचा यक्षप्रश्न सोडविणे अत्यावश्यक होते. १९२१–२४-पर्यंत पं. विष्णू दिगंबरांनी वामनरावाना तळमळीने विद्या दिली. परंतु संगितप्रचाराच्या दौऱ्यांवर विष्णू दिगंबरांना वरचेवर भारतात हिंडावे लागत असल्यामुळे नि त्यांच्या जीवनावर शेवटी शेवटी विरक्तीचे दारुण पटलहि आल्यामुळे वामनरावाना विद्याउपासनेचे सातत्य टिकविणे अशक्य झाले. एक प्रकारच्या निराश **मनस्थितीतच वामनराव पुनश्च कोल्हापूरला आले. घरातील वातावरण त्यांना पोषक वाटेना; शालेय जीवनाची समाप्ति झालेली; संगीत साधनेची सुरू केलेली वाटचाल अर्धवट कशी**








सोडणार ? जीवनाचे ते प्रमुख ध्येय होते ना ? अल्लादियाखाँ, भूर्जीखाँ, मंजीखाँ, गोविंदराव टेंबे इ. च्या चरणी बसून संगीत-साधना करण्याची मनस्वी तळमळ लागली होती. तथापि गुरुदक्षिणा कुठून आणणार ? कुटुंबाकडे व स्वचरितार्थाकडे लक्ष पुरविणेहि महत्वाचं होते; पोटा-पाण्याचा प्रश्न उभा होता. मोठा संभ्रम निर्माण झाला होता; समस्या उभी ठाकली होती.

हुकमी भांडवल एकच होते; गायकीचे उपजत ज्ञान नि साफ, स्वच्छ, गोळीबंद आवाजी ! या निर्मळ नि पल्लेदार आवाजाने वामनरावांची आजपर्यंत प्रामाणिक संगत केली आहे; कधीहि त्यांच्याशी प्रतारणा केली नाही.

निर्मळ आवाजाच्या या भांडवलाच्या जोरावर वामनरावांनी १९२५ मध्ये "महाराष्ट्र कोकिळ" शंकरराव सरनाईकांच्या "यशवंत संगीत मंडळी"मधे गायक नट म्हणून प्रवेश मिळविला नि आपल्या आयुष्यात नाटच-संगीताचे एक नवीन दालन उघडले; घराणेदार गायकीच्या विस्तीर्ण नि विलोभनीय मंदिरात प्रवेश करण्याचे केवळ माध्यम म्हणून ! शास्त्रीय संगीताच्या ध्रुव-ताऱ्यावर अढळ दृष्टी ठेवूनच ! विष्णू दिगंबरांनी दिलेली तीन वर्षांची बेगमी त्याना आता गायकीचे अविकृत भांडार म्हणून फार उपयोगी पडली. १९२५ मधे वामनरावानी खानदानी गायकीचा खूपच पल्ला गाठला होता. आलापचारी, ताल, लय, लयकारी, रागस्वरुप जिवंतपणे उभे करण्याची किमया इ. इ. चे ज्ञान त्याना बरेच प्राप्त झाले होते. त्याच्या जोरावर वामनराव नाटक मंडळीत झपाटचानी वाटचाल करू लागले. दैवानेहि याच सुमारास खैरात केली. महाराष्ट्राचे रसिक-वैभव असलेल्या गोविंदराव टेंब्यानी वामनरावाना हाताशी धरून संगीताची संथा देण्यास सुरवात केली.

कोल्हापुरातला हा काळ म्हणजे खानदानी गायकीचे सुवर्ण-युगच होते. अल्लादियाखाँसाहेब, हैदरखाँ, भूर्जिखाँ, मंजीखाँ नि गोविंदराव टेंबे यांच्या प्रतिभाशाली प्रज्ञेचा नि अनन्यसाधारण कलाविकासाचा हा भरभराटीचा काळ होता. कोल्हापूरचे दरबार-गायक म्हणून अल्लादियाखाँनी अजोड कीर्ति मिळविली होती. त्यांच्या अवघड नि अस्ताई-प्रधान ख्यालगायकीच्या रसरसणाऱ्या व पांडित्यपूर्ण आविष्काराने महाराष्ट्र दिपून गेला होता. नेति नेति म्हणून जाणकारांनी त्यांच्यापुढे हात टेकले होते. त्यांच्या तोला-मोलाचा गायक असेल, तरच त्याने कोल्हापुरातील तयार कान-सेनांच्या बैठकीत गाण्याचे धारिष्टच करावे. नाहीपेक्षा आपले चंबूगवाळे उचलून कोल्हापुरातून निघून तरी जावे ही पक्की भूमिका करवीर नगरवासी रसिकांची होती. गोविंदराव टेंबे नि शाळीग्राम बंधू यांसारखी जाणती-नेणती वजनदार मंडळी तर अल्लादियाखाँशिवाय कोणालाच मानायला तयार नव्हती. अल्लादियांच्या दैदिप्यमान व प्रतिभाशाली गायकीपुढे, तितक्याच तोलामोलाच्या त्यांच्या मुलांचेहि तेज पडेनासे झाले होते. ही वस्तुस्थिती होती.

खुद्द वामनरावांच्या गोळीबंद आवाजीवर मंजीखाँ खूष होते. तथापि, अनेक नाटकांत त्यांचा गानविष्कार पाहूनहि, प्रत्यक्ष गंडा बांधल्याखेरीज, ते विद्या देण्यास तयार नव्हते. "यशवंतराव संगीत मंडळीशी" कराराने वामनराव बांधले गेले होते. शिवाय वामनरावांसारख्या धारदार आवाजीच्या नटाला शंकरराव सोडा-यलाहि तयार नव्हते. पैश्याच्या अडचणीमुळे मंजीखाँचा गंडा बांधणेहि वामनरावाना शक्य नव्हते. उरले भूर्जीखाँसाहेब. फार वर्षांपासून वामनरावांचे मन भूर्जीखाँसाहेबांच्या भोवती भोवती घुटमळत होतेच. भूर्जीखाँच्या गायकीची हृदयास भिडणारी नि बुद्धीस आवाहन करणारी पठडी, सौजन्याने वागण्याची त्यांची पद्धत, निरहंकारी वृत्ति, अस्सल ब्राह्मणी रीतिरिवाज, स्वच्छ मराठी बोली, प्रातःकाळी उठून, स्नान करून, अंबाबाईचे दर्शन घेण्याची धार्मिक शिस्त, यावर वामनराव मोहित झाले होतेच. वामनरावांच्या नाटच-गायकीवर खुद्द भूर्जीखाँहि निहायत खूष होते. तथापि, वामनराव हा आपला हुकमी एक्का असून, त्याना सोडल्यास गाण्याच्या बाबतीत नाटक उघडे पडेल, हेहि शंकरराव सरनाईक जाणून होतेच.

कराराची मुदत संपताच, दि. ४–१२–१९३२ रोजी अकोला मुक्कामी वामनरावानी "यशवंत संगीत मंडळी" सोडली नि ध्येय-पूर्तेतेच्या इर्षेने पेटून, पैशाची जमवाजमव करून, एका सु-मुहूर्तावर १९३६ साली भूर्जीखाँचा गंडा बांधला. 'आताच; नाहीतर पुन्हा कधीहि नाही' ही पक्की खूणगाठ त्यानी बांधली होती. 'वामनरावाना मजजवळ द्या' ही भूर्जीखाँची भूमिका वामनरावांच्या वडिलांनी मानली हे संगीताचे केवढे भाग्य ! भूर्जीखाँची सच्ची तालीम वामनरावाना चौदा वर्षे लाभली.

भारतीय खानदानी संगीत हा मुळातच गौरवाचा नितांत रम्य विषय. कोल्हापूरने भारतीय संगीताची थोर परंपरा, प्रतिष्ठा नि बूज राखली. याच कोल्हापूरच्या छत्रपति शाहू महाराजानी भूर्जीखाँ-

**के. डी. विरुद्ध स. का.**




"यापुढे दोघांपैकी एक कोणीतरी काँग्रेसमध्ये राहिल"
–इति मालवीय

सारख्या जयपूर परंपरेच्या नामवंत कलाकाराची दरबार गायक म्हणून प्रतिष्ठा मानली नि वृद्धिंगत केली. भव्य नि सम्राटास शोभेल असं व्यक्तिमत्व, तेजस्वी डोळे नि गोबरे गाल आणि मर्दानी शरीरयष्टी असलेल्या भूर्जीखाँनी वामनरावाना पदरात घेतलं, पुत्रवत् त्यांच्यावर प्रेम केलं, आत बाहेर न करता जवळची सारी तेजस्वी विद्या, हातचे न राखून, दिली; खास तालीम दिली. मुंबई-तल्या मुक्कामी असताना, एकाग्रता व्हावी या हेतूने, वामनरावाना बँडस्टँडसारख्या निवांत जागी दररोज नेऊन, वाकावर आंगठीने स्वतः ताल धरून, अनेक चीजा शिकविल्या नि विद्यादानाचे पुण्य पदरी बांधले. सत्पात्री विद्यादानासारखे पुण्य जगात दुसरे नाही असे मानणारी थोर भारतीय गुरु-परंपरा ! भूर्जीखाँनी, या परंपरे-तील एक टप्पा, म्हणून आपले श्रेष्ठत्व सिद्ध केले. त्यांच्या दानाच्या या तळमळीने वामनराव भारून गेले. त्यांच्या बद्दलची कृतज्ञता वामनराव वारंवार व्यक्त करतात; खानसाहेबांच्या ऋणाने नतमस्तक होऊन 'माझे भाग्य थोर म्हणून असा साता जन्मात न लाभणारा गुरु गवसला' असे उद्गार काढतात. तसेच 'माझ्या गुरुचे थोरपण किती होते याचे आकलन झाले तरी, त्यांच्या विद्या-दानापैकी एकहि सुवर्णकण मी वेचू शकलो नाही; त्यांच्या इतकी विद्या-साधना करण्यास दहा जन्महि अपुरेच पडतील,' अशी विनय-शील भूमिकाहि घेतात. या विनयशीलतेतच नि विनम्र वृत्तीत वामनरावांचे मोठेपण सामावलेले आहे.

भारतीय संगीताचे एक दुर्दैव असे आहे, की जिवंत संगीताची केवळ प्रतिकृति म्हणून ज्या व्यक्ति असतात त्या अकाली निघन पावाव्या असा विघीलिखित नियमच असतो की काय ? कळत नाही ! मंजीखाँ अकाली गेले. तसेच भूर्जीखाँहि ! दि. ६–५–१९५० रोजी भूर्जीखाँ निवर्तले नि दुर्दैवाने भूर्जीखाँ नि वामनराव ही जोडी भंगली. पल्लेदार नि गोळीबंद आवाजीने मोहोरलेली, लयकारी-युक्त, रसपूर्ण जी गायकी वामनराव आज गातात ती 'माझ्या गुरुची देणगी होय,' असे ते मानतात. काय योग पहा ! मराठी रंगभूमीच्या द्वारानी घराणेदार संगीताच्या विलोभनीय दालनात प्रवेश करणाऱ्या वामनरावानी नाट्य-गायकी नि खानदानी जयपुरी गायकी दोन्ही आत्मसात करून, मराठी रंगभूमीवरील एका सुरेला गायक-नट नि घराणेदार गायकीचा एक रसिला कलावंत म्हणून दिगंत कीर्ति मिळविली. १९३८ सालच्या लाहोरच्या संगीत परिषदेत वामनरावांच्या अस्ताई-प्रधान व लयकारीयुक्त गायकीची खूपच जाहिरात झाली नि "वामन ! धन्य आहे तुझी !" असे उद्गार त्यांच्यावर नाराज झालेल्या त्यांच्या एका बंधूनी काढले.

हयातभर गानक्षेत्रात वावरून गायकीची सखोल नि अभ्यासपूर्ण चिकित्सा करणाऱ्या केशवराव भोळयांनी 'गाण्यातील रस जास्त ओळखणारे' असा वामनरावांचा खास गौरव केला आहे. 'जयपूर घराण्याचा एक निराळा, रसिला व तडफेचा गायक असा कै. ग. ह. रानडयांनी वामनरावांचा गुणगौरव केला आहे. तसेच "विद्वानांना स्तिमित करणारी व जाणकारांच्या बुद्धीस धक्का देणारी" असे जयपुरी गायकीचे वर्णन, ग्वाल्हेर नि आग्रा घराण्यांच्या गाय-कीचा खास अभ्यास करून, जयपूर गायकीवर मोहित झालेल्या ज्या पं. गजाननराव जोशांनी केले आहे ते गजाननराव जोशीहि वामनरावाना फार मानून आहेत, हे थोडयानाच माहित असेल.

मराठी नाटयक्षेत्रात, शंकरराव सरनाईकांच्या "यशवंत संगीत मंडळीने" सादर केलेल्या "मानापमानात" धैर्यधराची, "मृच्छ-कटीकात" चारुदत्ताची आणि गोविंदराव टेंब्यांच्या "गोस्वामी तुलसीदास" या नाटकात तुलसीदासाची या वामनरावांच्या भूमिका गाजल्या. "गोस्वामी तुलसीदास" नाटकातले "राम रंगी रंगले" हे पद लोकप्रिय करणारा पहिला मानकरी वामनरावच ! नाटयसंगीताची प्रात्यक्षिकेहि वामनरावानी महाराष्ट्रात अनेक गावी फिरून दिली आहेत.

गायन-क्षेत्रात जीवापाड मेहनत घेऊन, अडचणींच्या नि हाल-अपेष्टांच्या फत्तरावर आपली जीवननौका आपटून ज्यानी दिग्विज-याचा किनारा गाठला ते सर्वच कलावंत श्रेष्ठच आहेत. त्यांची एकमेकाशी तुलना अनुचित होय. तथापि इतकेच म्हणता येईल की, सूरश्री केसरबाई, मोघूबाई, निवृत्तिबुवा, मल्लिकार्जुन मन्सूर, गजाननराव जोशी इ. अति थोरांच्या पंक्तीत, संगीताच्या न्याय-निष्ठूर नि अपक्ष समीक्षकास, वामनरावांकरिता एक मानाचे ताटपाट वाढून ठेवावेच लागेल; जयपूर घराण्याचा त्यांचा वारसा मान्य करावा लागेल.

वामनराव सध्या "गांधर्व महाविद्यालय विद्यापीठाच्या" पी. एच. डी. परीक्षेचे सन्माननीय परिक्षक आहेत. "१९१६ ते १९४०-च्या कालखंडात कोल्हापूरला लाभलेल्या नामांकित गान-गंधर्वांच्या सहवासाच्या परिसाने माझ्या आयुष्याचे सोने झाले" हा वामन-रावांचा स्वतःबद्दलचा विनयशील निष्कर्ष आहे. या विनम्र भूमिके-मुळेच ते आज जयपूर घराण्याचे एक प्रतिनिधी बनले आहेत.

पं. वामनराव सडोलीकर म्हणजे मराठी मनाला वर्षानुवर्षे मोहिनी घालणारे नाट्य-संगीत नि नेणत्यांच्या बुद्धीस भुरळ घाल-णारे घराणेदार खानदानी संगीत यांचा मनोहारी समन्वय ! पं. वामनराव म्हणजे नाटयसंगीताची सुवासिक पुष्पे नि हिंदुस्तानी संगीताची चवदार फळे धारण केलेला डेरेदार संगीत वृक्ष ! वामन-राव म्हणजे सच्ची तालीम लाभलेला, निर्मळ आवाजीचा, अति-सुरेली, पिळदार नि कमालीचा रसपरिपोष करून कलात्मकतेने विनटलेली सामर्थ्यवान तानक्रिया सफाईने लीलया करणारा एक रसिला कलावंत ! ●●●

## महत्वाची सूचना

**ज्यांची वर्गणी या अंकाने संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाही.**

**—व्यवस्थापक**

# एक बेचैन करणारी कथा

**स्मशानात ही भली थोरली पिंपळाची झाडे, आणि त्या भंवतीचे पार. त्यांची व्यवस्था करणारा मोठा चतुर असला पाहिजे. त्या झाडांमुळे, स्मशान कसे मारदस्त दिसत आहे. पलीकडे प्रवेश-द्वाराशी भजन करीत असलेले ते दोन म्हातारे भिकारी........**



—वामन प्रभु

**सुमन** आल्या वार्ताचे मला पांच मिनिटांपूर्वीच कळले. लाकडी जिन्यात माझी पावले वाजताच खाली राहणाऱ्या जाधवांनी मला हाक मारून बोलाविले. मी त्यांना किती वाजले म्हणून विचारले. तेव्हा दहा पन्नास झाले होते. अर्ध्या तासापूर्वी विठूकाका येऊन गेले होते. आणि त्यांनी जाधवांकडे निरोप ठेवला होता...

बाहेर संध्याकाळपासून पाऊस पडत आहे. दिवस अमावास्येचा, आणि मी खूपच कंटाळलेला.

जीवनाचा वेग खूपच मंदावलेला असल्याचं मला संध्याकाळी एकसारखं वाटू लागले, तेव्हा मी नरेशचंद्र विटणकरावरोबर होतो. कितीतरी वेळ विश्रांतीगृहात कडक कॉफीसोबत इष्क आणि शायरी ह्यांचे अफसाने सुरू होते. पण आज कशात म्हणून रस येत नव्हता. वेगाने धावणारी वाहने-देखील रेंगाळत जात असल्याचा भास होत होता. रस्त्यावरचे लोक अडखळत थवकत चालत होते. वारा तर असून नसल्यासारखा पडला होता. पानें हलली एखादवेळी तर कुणी मुद्दाम हलविल्यासारखी हलायची. पावसाला काय तो स्वतःचा असा वेग होता. वरून कुणीतरी आवेगाने हजारो भाले खुपसल्यासारखा पाऊस वरसत होता.

हे असे कां वाटते आहे हे कळत नव्हते. अजूनही कळलेले नाही. एवढे खरे की, 'जीवन कसे गतिशून्य झाले आहे' असे काहीतरी मी नरेशचंद्राला म्हणालो होतो. त्यानंतर नऊ पन्नासची बस पकडून लक्ष्मीभुवनला उतरलो.

घरी जाण्याची इच्छा होईना म्हणून लक्ष्मीभुवनचे चार जिने चढून सर्वात वरच्या मजल्यावर आलो, आणि साखरेच्या खोलीचे दार ठोठावले. बऱ्याच वेळानंतर दार उघडले गेले. परतावे वाटले पण एकदम जाणे बरे दिसले नसते म्हणून थांबलो.

खोलीत तिशी उलटून गेलेली काळचाशार रंगाची कुरुप मायाताई एम. एड्. चा अभ्यास करीत असल्याचा देखावा करीत होती. स्कॉलर साखरे बहुधा तिच्याच साडीची लुंगी नेसून कुठले तरी पत्र टाईप करीत होता. दार बंद असताना ह्या खोलीत असाच देखावा होता हे सिद्ध करण्याचा दोघे ते आटापिटा करीत् होते. आणि तरीहि त्या खोलीत भरून असलेला अतिशय खालच्या दर्जाचा वासनेचा दर्प माझे डोके गरगरवीत होता. खोलीच्या मधोमध **विस्कटून पडलेल्या गादीकडे माझे लक्ष गेले...मग मी साखरेकडे पाहिले. त्याच्या चेहऱ्यावर मायाताईच्या कुरुप**



अनुक्रमणिका

# वेग हरवलेली रात्र

चेहऱ्यावरील ओंगळवाणेपणा पसरून होता.

मग मी त्यांचा निरोप न घेताच सारे जिने उतरून खाली आलो. भोवतीच्या अंधारातून हळू हळू घराकडे सरकू लागलो.

मन आता पूर्वीपेक्षाही जड झाले होते. कां झाले ते कळत नव्हते. ते कळून घेण्यासाठी विचार करणेही जड जात होते. कुठेतरी काहीतरी खास चुकले होते... चुकत होते–हे मात्र नक्की.

पांच मिनिटापूर्वी मी जिना उतरून खाली आलो. "नाईक रोड़ला तुमची आत्या राहते ना?" अडखळत जाधवांनी विचारले. काहीतरी विशेष असल्याचं मी ताडलं. एकदम कान आतुर झाले. एकदम मन भानावर आलं. अंधारात अस्पष्ट दिसणाऱ्या जाधवांच्या चेहऱ्याकडे मी पाहिलं. "तुमच्या आत्या. ...म्हणजे थोड्या वेळापूर्वीच वारल्यात. त्या डॉक्टर होत्या त्या". जाधव एका दमात म्हणालेत. मी स्तंभीत झालो.

हळू हळू विचार करू लागलो. सारे नातेवाईक आठवू लागलो. पण डॉक्टर असलेली आत्याच आठवेना. पांच मिनिटे मी ह्या एकाच विचारात गुंतलो होतो. शेवटी एकदम सुमन आत्या आठवली. तिच्या चेहऱ्यावरचे नेहमीचे प्रसन्न हास्य आठवले आणि नकळत घरून आपण नाईक रोडकडे भर पावसात निघालेले आहोत हेही जाणवलं.

पण सुमन आत्याची आठवण येण्यासाठी मला एवढा वेळ कां लागाला बरे? आता आठ दिवसांपूर्वीच तर मी चिमूरला जाऊन आलो. त्यावेळी सुमन-कमल आत्यांबरोबर गमती जमती केल्या होत्या. खूप हंसलो होतो. खोटा-खोटा रुसलो होतो आणि तऱ्हेतऱ्हेचे मजेशीर विनोद.

मी मनातील विचार परत आवरतो आहे. परत परत आवरतो आहे. कारण विचार करताना कमल आत्या आणि सुमन आत्या ह्यांची माझेकडून सारखी सरळमिसळ होते आहे. सारखा गोंधळ उडतो आहे. सुमन आत्या वारली असे न वाटता आता मला कमल आत्या वारली असेच एकाएकी वाटू लागले आहे. इतक्या तीव्रतेने वाटू लागले आहे की...

आणि तसे वाटणे ह्यात नवल काहीच नाही. सुमन आत्याला मी पहिल्यांदा पाहिले ते कमल आत्यांसोबतच. शहरात राहणाऱ्या दोन आत्या ( माझ्याहून लहान वयाच्या ) गांवी आल्या होत्या. आम्ही खूप खेळलो होतो. आणि त्या दोघीही आमच्याहून वेगळं-साफ-स्वच्छ-शुद्ध असं बोलत होत्या. ही त्यांचेविषयीची पहिली आठवण. त्यानंतर दरवेळी मी त्यांना समवेतच पाहत आलेला.- आज शेवटचं असं समवेत पहायला निघालेला.

सायकलीचे पेड्ल जोरजोराने दाबतो आहे. पण अजून बरडीच यायची आहे. महाराज वागे पासच्या उतारावरून सायकल आता बरा वेग घेते आहे. पण घाई करायला हवी. कदाचित् मी जाईपर्यंत सारं संपलेले असेल.

पावसाच्या कोसळत्या धारात ही झाडे कशी दिसताहेत. शंकरने एकदा म्हटले तशी. ओल्याचिंब झालेल्या भेदरलेल्या पांखरासारखी. आणि अपुऱ्या प्रकाशात हलणारा तो वेलीवरचा बहर...जीवनाच्या वेलीवर उमललेलं एक फूल आज गळून पडलं आहे. अनंत–अनाकलनीय अशा मरणांधकारात एक ज्योत मिसळून गेली आहे. आपण सारेच मृत्यूच्या वेलीना आलेला बहर.. जीवन म्हणजे अंधारातून अंधाराकडे... ऐ गमे दिल क्या करूं अै वहशते दिल क्या करूं. जी मे आता है, ये मुर्दा चांद तारे नोचलूं इस किनारे नोचलूं और उस किनारे नोचलूं..

अंधार जीवनावर प्रेम करून कंटाळलेल्या दुःखी मजाजच्या ह्या ओळी माझ्या तोंडातून एवढ्या मोठ्याने बाहेर कां पडाव्यात. ते कळत नाही. अकरा वाजून गेल्याचे 'शिवराज'च्या टॉवरमधे दिसते आहे. आणि मी हा असा वेड्यासारखा..

उगीचच एवढ्याचे एवढे मोठे करण्याची मला संवय असावी. जीवन हे अशाश्वत आहे. कधी तुटेल श्वासाचा वसा नाही भरवसा. आयुष्य संपलं...मेली. ह्यांत शोक करायचा कशाला. पुढल्या जीवनाविषयीचा अंधःकार म्हणून. 'किती हे विशाल... नजरेच्या पार दूरच दूर प्रेमाचा पूर शांतीच्या लाटा' असं मृत्यूचं चित्र असेल तर..पण मी कुठं शोक करतो आहे. दुःख आहे ते वियोगाचं...छे कसलं दुःख होतं आहे. नक्की काय वाटतं आहे हे माझ्या समजण्याच्या कुवतीच्या पलीकडचं आहे. जीवनातील अनिश्चितता तेवढी मधून मधून मला जाणवते आहे. आणि अनाकलनीय मृत्यूच्या गूढ जाणीवेचे माझ्या मनावर पडसाद उमटले आहेत. एवढेच फक्त, एवढेच.

रात्र वाढलेली आहे. रस्त्यावर तुरळक वाहतुक. दुकाने केव्हाचीच बंद झालेली आहेत. कदाचित ते लोक आता तिरडी तयार करीत असतील. आणि बावीस वर्षे वयाच्या एका कोवळ्या पोरीला शेवटचा खांदा देण्यासाठी एव्हाना मंडळी जमू लागली असेल. पण हे सारे झाले कसे? आठ दिवसांपूर्वी हंसत होती ती निरोगी सुमन आत्या आणि चिमूर-नागपूर मधले शंभर मैलांचे अंतर...कोण कोण असतील इथे ? काकाजी, काकू आणखी कोण कोण? त्यांना काय वाटत असेल.

नुकतेच भास्कर काकांचे लग्न झाले. त्यांना काय वाटत असेल. विठू काकांचे घर मी बांधायला घेतले आहे. पण एवढ्यात काम बघायला गेलोच नाही. विठू काका तिथं असतील. पण आज व्यवहाराचं कोणी बोलणार नाही. भाऊबंदातील तीव्र मतभेद बाजूला सारून








ह्या साऱ्यांत मिसळून गेलेले विठूकाका, त्यांना किती दुःख झाले असेल. बरे. . पण ह्या साऱ्यांना दुःख कां व्हावे? मला तरी दुःख कां व्हावे. कां व्हावे दुःख?

दुरून नाईक रोडच्या गल्लीत गॅसबत्त्या दिसल्यात म्हणून मी सायकलीचा वेग कमी केला. घराच्या बाजूला सायकल ठेवली. कुलूप लावले आणि मोठ्या काकांच्या शेजारी येऊन चुपचाप उभा राहिलो. येथील वातावरणाचा आता एकाएकीच माझ्यावर परिणाम होऊ लागला आहे. आपण सायकलीला कुलूप लावण्याचा व्यवहारीपणा कसा केला ह्याची मला आता लाज वाटू लागली आहे.

घरातील जागेच्या अडचणींमुळे सुमन आत्याचा मृतदेह शेवटल्या महास्नानासाठी बाहेर आणलेला आहे. आडोसा म्हणून चारहि बाजूनी पडदे धरून चार काका उभे आहेत. आणि आत भर रस्त्यावर पडद्यांच्या आडोश्याने अपरात्री एक कुमारिकेला आंघोळ घालण्यात येत आहे. स्फुंदत हुंदके देत सुमन आत्याची आई आणि साऱ्यांच्या सुशीला काकू आपल्या लाडक्या लेकीला आंघोळ घालीत आहेत. सुमन आत्याचे वडील—काकाजी खिन्नपणे कुठेतरी पहात उभे आहेत. रस्त्यावर गॅसबत्तीच्या प्रकाशात सुमन आत्याचे मामा तिरडी बांधीत आहेत. तिरडी.. .जिचेवर सुमन आत्याचा निष्प्राण देह थोडयाच वेळानंतर आवळल्या जाणार आहे. आपण वेळेवर पोहोचल्याचा सूक्ष्म आनंद कुठेतरी मनात रेंगाळत असल्याचं जाणवून अस्वस्थ होऊन मी हे सारे भारल्या नजरेनं बघतो आहे. थोरल्या काकांना पाहतो आहे. सुमन आत्याचे सख्खे भाऊ—वामनकाका, भय्याकाका, भास्कर काकांना बघतो आहे. आणि विठू काकांसमवेत हरीकाकांना इथे बघून मला आश्चर्य वाटतं आहे.

नात्यातील आणि परिचीत कितीतरी मंडळी इथे जमलेली आहे. भास्करकाकांच्या लग्नात आठ दिवसांपूर्वी जमली होती तीच सारी माणसे. डॉक्टर भास्करकाकांचा चिमूरचा व्यापारी दोस्तहि आपल्या बुलनच्या सदऱ्यात माझ्या बाजूला उभा आहे. हे सारे एकाएकी कसे झाले हे मला सांगतो आहे. माहिती देतो आहे. जणू हे सारे असेच एकाएकी घडायचे होते. घडत असते ह्याची मला पूर्ण जाणीव असल्यासारखा निर्विकार मनाने मी सारं ऐकतो आहे. पडद्याआड आपल्या पोरीला न्हाऊ घालणाऱ्या आईला सुशीला काकूंचे हुंदके सुद्धा.

पण कमल आत्या कुठे दिसत नाही आहे. परत तोच अभद्र विचार. हे बरे नव्हे. भोवतीच्या शांत. स्तब्ध वातावरणात हे अजीबात म्हणजे बिलकूल योग्य नव्हे.

आपण ह्या साऱ्यात काही तरी करायला हवे आहे म्हणून मी हरीकाकांचे शेजारी जातो. नुस्ताच उभा राहतो. आम्ही एकमेकांकडे बघून नुस्तेच











स्तब्ध. वारा असून पाने कां हलू नयेत? आम्ही स्तब्ध कां? हे मौन कां? हे गांभीर्य कां? सुमन आत्याचा आत्मा तिच्या देहाला सोडून आम्हाला न विचारता निघून गेला. आता हा उरलेला मातीचा देह... आम्ही सारे मिळून त्याची योग्य विल्हेवाट लावणार आहोत. आतापर्यंत असेच चालत आलेले आहे. येथील प्रत्येकानेच कुणाला ना कुणाला खांदा दिलेला असेल. त्याना दुसरे कोणी खांदा देतील. ही एक साखळी आहे. पृथ्वीतलावर मृत्यूचा जन्म झाला तेव्हापासूनची. अनादि मानवाचे प्रेत कुजून पंचतत्वात मिळाले असेल. आम्ही त्याची पद्धतशीर विल्हेवाट लावणार आहोत. सोबत गॅसबत्त्या आहेत. घाटाकडे जाण्याचा रस्ता गॅसबत्तीवाल्यांच्या तर परिचयाचाच असेल. त्यांना हमालीचे पैसे वसूल करण्यासाठी कितीदां तरी हीच वाट तुडवावी लागेल.

"सतीश कुठं आहे.. सविता कुठं आहे.... आणा त्यांना... बघा रे तुमची सुमन मावशी गांवाला जाते आहे... बघून घ्या शेवटलं असं बघून घ्या रे".. सुशीला काकू आपल्या मोठ्या मुलीच्या इवलाल्या पोरांना म्हणताहेत. आणि जोरजोराने हुंदके देताहेत. त्यांना बिलगून कमल आत्या उभी आहे. भेदरलेल्याओल्या-चिंब पांखरासारखी. मघा येताना वाटेत दिसलेल्या द्राडासारखी. कमल आत्याची वडील बहिणच गेलेली नाही तर जिवाभावाची मैत्रिण सुद्धा. "किती छान जोडी होती हो; कमल-सुमनची. जोडीनं यायच्या, जोडीनं जायच्या. नेहमी जोडीनं... कसं झालं बेटा कमल... आता एकटीच राहिलीस तूं..." सुशीला काकू म्हणताहेत. आणि कमल आत्याच्या श्वासांचा वेग वाढला आहे.

पण 'सुमन गांवाला जाते आहे' असे त्या आताच म्हणाल्या ना. गांवाला जाणाऱ्या व्यक्तीबद्दल मग हा एवढा शोक? की गांवाहून परत येणार नाही म्हणून.

कसले तरी धागे आमच्या चार-पाचजणांच्या हाताभवती गुंडाळण्यात आले आहेत. आणि स्मशानाच्या दिशेने गॅसबत्तीच्या प्रकाशात पांच-पन्नास माणसांचा मूक जमाव निघालेला आहे. समोर दोन भाऊ खांदा द्यायला आणि मागे दोघे. मागल्या दोघात विठू काका आहेत. चुलत असूनही सख्खेपणाने वागणारे. विठुकाकांचा चेहरा किती उदास आहे. तीस वर्षे वयाच्या ॲडव्होकेटच्या चेहऱ्यावर ती काळवंडलेली छाया. आणि माणसे एवढी झपझप कां चालताहेत? स्मशानाची वाट हा सारा जनसमूह आपल्याकडे खेचून तर घेत नाही आहे?

मी पहिल्यांदाच स्मशानाकडे अशा तऱ्हेने निघालो आहे. शाळेत असताना स्मशानात नेहमीच जाऊन वसत असे. पण माझ्या आयुष्यातली ही पहिलीच शवयात्रा. त्यामुळे कसे वागावे... काय करावे ते मला कळत नाही. पण नकळतच मी ओढला जाऊन विठुकाकांचा खांदा मोकळा करतो आहे. एका हाताने हलणारा चेहरा धरून ठेवतो आहे. सुमन आत्याच्या देहाचा तो गार मृत स्पर्श माझ्या हातातून साऱ्या शरीरात भिनत आहे. जिने आपल्या तारुण्याची पहाट तेवढी पाहिली आहे अशा एका तरुण कुमारिकेच्या मृत देहाला मी स्मशानाकडे नेतो आहे. छे. तारुण्याची अकालीच सुकलेली-कोसळलेली स्वप्ने तिरडीवर बांधून आम्ही स्मशानाकडे जातो आहे. ही स्मशानाची वाट हळू हळू हिचेशी सलगी लावावयाला हवी आहे. हीच शेवटली वाट. आज ही पन्नास माणसे स्वतः तुडवीत आहेत. आणि उद्या कुणाच्या तरी खांद्यावर त्यांच्या आशा—आकांक्षाचे-स्वप्नांचे प्रेत ह्याच वाटेने जाणार आहे. पण स्वप्नांचे वेड असणारा प्रत्येक जण रोज जुन्या स्वप्नांना खांदा देऊन वाहण्याखेरीज काय करीत असतो?

सारी माणसे लाकडे आणावयाला गेली आहेत. तिकडे दूरच्या कोपऱ्यात लाकडांचे ढिगारे रचून ठेवलेले आहेत. स्मशानात लाकडाची वखार लावण्याच्या हक्काचा दरवर्षी लिलांव होतो म्हणे. खास सोय म्हणून स्मशानातच मरणाची नोंद करण्याचे ऑफीस आहे, तिकडे विठुकाका गेले आहेत. छत्री उघडून खिन्नपणे उभे असलेले काकाजी आणि गॅसबत्त्या वाहून आणणारे मजूर वगळल्यास शवापाशी मीच एकटा आहे. आणि पहिल्यांदाच असा मी सुमन आत्याच्या आत्म्यापासून विलग झालेला देह बघतो आहे.

ह्या देहाला सुमन आत्या कां म्हणावे तेच मला कळत नाही. माझ्या सुमन-आत्याशी ओळख पटवणारे इथे काय उरले आहे बरे! तो हास्य. तो नजरेतील जिवंत खेळकरपणा. सारेच तर येथे गैरहजर आहे. काळा ठिक्कर पडलेला चेहरा.... आणि ओळखू न येणारे नाक डोळे.

स्मशानात ही भली थोरली पिंपळाची झाडे आणि त्या भोवतीचे पार. त्यांची व्यवस्था करणारा मोठा चतुर असला पाहिजे. ह्या झाडांमुळे स्मशान कसे भारदस्त दिसते आहे. स्मशानाचे गांभीर्य वाढले आहे. आणि पलीकडे प्रवेशद्वाराशी भजन करीत बसलेले ते दोन म्हातारे भिकारी... त्यांचे कोणी नाही म्हणून स्मशानाच्या द्वारी धरणे धरून बसलेले, आणि ह्या भल्या थोरल्या शेड्स. बाजूला शेडमधे एक चिता जळते आहे. तिचा प्रकाश आमच्या चेहऱ्यावर पडून आम्ही अधिक जिवंत तर भासू लागलेले नसू?

ह्या शेडच्या पाठीमागे रोडावलेली नाग नदी रुकत रुकत वाहते आहे. काळाची अंधार नदी किती झपाट्याने वाहत असेल. आणि तरीही हा वेग जाणवत नाही. कुठली तरी सुमन आत्या मरते आणि क्षणभर आपण थबकून तो वेग जाणवून घेतो. आणि परत मृत्यूच्या दिशेने जगण्यावर निष्ठा ठेऊन आपला प्रवास सुरू होतो.

जो देह कुठल्या तरी स्वप्नील तरुणाने पुष्पशय्येवर फुलासारखा ठेवला असता, त्या देहावर आता लाकडे रचली जात आहेत. कुणीतरी विशेष माहिती असलेला






अनुक्रमणिका

कुठले खोड कुठे ठेवायचे ते सांगतो आहे. 'उशाखाली गोवऱ्या द्या'. 'पायाला हे लाकूड पुरायचे नाही.' 'तुम्ही बॉडी हलवू नका' अशी कितीतरी व्यवहारी वाक्ये.

सुमनआत्याचा आत्मा आसपास घुटमळत असेल, तर त्याला काय वाटत असेल. हे सारं बघून, हूं! त्याला काय वाटणार आहे? पुढल्या सौंदर्यपूर्ण वातावरणाकडे बघून आम्हा न मेले-ल्यांच्या दुर्दैवाचे कदाचित दुःख होत असेल त्याला.

घरून निघाल्यापासून मी सुमन आत्या आणि मृत्यु ह्यातच सारखा घोटाळतो आहे. तसे पाहिले तर विशेष असे काय होते सुमनआत्यात. सुमन-कमल आत्यांच्या जोडीचे अस्तित्व माझ्या मनात होते. वेगळी सुमनआत्या ? सुमनआत्याचा वेगळा असा मी विचार केलाच कुठे?

पण तरीही मी सारखा ह्या वाता-वरणात गुरफटतो आहे. आता तर मला स्पष्ट जाणवते आहे की, सुमन आत्या मेली ह्याचे सर्वात जास्त दुःख मला होते आहे. कारण ह्या साऱ्यांहून सुमन-आत्याच्या मरणाचा खराखुरा अर्थ मलाच उमगतो आहे. सुसंस्कारीत अशी एक तरुण कुमारिका ह्या जगातून गेली आहे. ह्या स्वार्थात बुडालेल्या समाजातून एक स्वप्न पाहणारी तरुण मुलगी मेलेली आहे. एवढंहि माझ्या दुःखाला सीमीत अर्थ नाही. त्या पल्याडचे काही-तरी अस्पष्टसे मला जाणवू लागले आहे.

काही वेळापूर्वी मी नरेशचंद्राला माझ्या आयुष्यातील वेग हरविला म्हणून म्हणालो होतो. हे मला उगीच आता आठवते आहे. मला साखरेची खोली आठवते आहे. मायाताई आणि साखरे. त्यांच्या चेहऱ्यावरील चोरटी आणि म्हणूनच भिजळलेली भावना आठवते आहे. झाडांची कीडलेली भेदरली पांखरे, मृत्यूच्या वेलीला आलेला बहर, हे जीवन, ऐ गमे दिल क्या करू मधील मजाजची अगतिकता, मृत्यु-विषयक माझ्या अनेक कवितांतून आलेले संदर्भ, आणि एका निर्जीव देहाला एथवर खांदा देऊन आणतेवेळी सारे सारे विचार मला ,एकाएकी आठवू लागले आहेत. सुमनआत्याच्या धग-धगत्या चितेच्या भडक प्रकाशात माझ्या चेहऱ्यावरचा जिवंतपणा तर अधिकच उजळला आहे. पण मला कुठल्यातरी अनामिक–खोल जाणिवेच्या मंगल पवित्र प्रकाशाने माझ्या अंतरंगात युगायुगांपासूनचे मानवाचे दुःख ठळक-पणे उमलू लागले आहे.

•••










जीवन हा प्रवास आहे, हे मान्य केलं, तर....सारे आपले सोबती....आणि सोबती म्हटल्यानंतर ते नामवंतच असणार एवढीच अपेक्षा जीवनसाथी करीत असतो.

# जिवाला जीव दे(घे)णारे...

—सुरेश मुळे

**'जीवन** हा एक प्रवास आहे.'—कुणी एक तत्वज्ञानी.

'जीवन हा सेंट्रल रेल्वेच्या कल्याण-लोकलचा ठाणे ते दादर पर्यंतचा थर्ड क्लासचा प्रवास आहे'—मी

आता 'जीवन हा प्रवास आहे' हे दोन मोठ्या माणसांनी सांगून देखील तुम्हाला पटलं नसेल तर तुम्ही रेडिओ सिलोन-वरची कोणतीहि दहा फिल्मी गाणी ऐका. दहापैकी निदान एका गाण्यात तरी तुम्हाला 'मैं मुसाफिर् हूँ, तेरेऽऽ' इत्यादि इत्यादि प्रवास वर्णनं, प्रवास स्थळं सांपडतील. 'मेरी मंझिल' (मंदीर? मंदील?) वगैरे उल्लेख सांपडतील. 'मुझे मंझिल् ना मिली' वगैरे वगैरे करून रडणारा हिन्दी नायक सिनेमाच्या शेवटी नायिकेचं प्रवासस्थळ गटवल्यावर खूष होताना पाहून मंझिल शब्दाचा गैर-समज होण्याचा संभव आहे! तरी पण जीवन हा एक प्रवास आहे हे मान्य व्हायला हरकत नसावी. रेडिओ-सिलोन-सारख्या मान्यवर आंतरराष्ट्रीय संस्थेचा दाखला दिल्यावर देखिल तुम्ही हरकत घेणार असाल तर मात्र तुम्हाला लोक-सभेतच पाठवायला पाहिजे! जीवन हा एक प्रवास आहे म्हटल्यावर सहाजिक कुठला प्रवास, कधीचा प्रवास इत्यादि प्रश्न उभे रहातील. आणि म्हणूनच मूळच्या विधानाला पुष्टी जोडलेली आहे. तर ते एक असो.

सामान्यपणे माणसाचं एक तृतीयांश आयुष्य झोपण्यात जातं आणि एक बारांश आयुष्य कुठून कुठेतरी प्रवास करण्यात जातं असं धरलं तर आयुष्यातल्या एवढ्या मोठ्या कालखंडात मानवाला साथ देणारा ढेकूण हा प्राणी मानवाचा सहप्रवासी म्हणून ओळखला जावा, असं म्हटलं तर ते मान्य व्हावं. वास्तविक ढेकूण ह्या प्राण्यावर मराठीत इतकं लिहिलं गेलं आहे की समस्त चार कोटी मराठी माण-सांना चावणाऱ्या ढेकणांच्या संख्येपेक्षा ढेकणांवरच्या लेखांची संख्या जास्त भरेल! तरीपण-तरीपण प्रस्तुत लेखाशिवाय ढेकूण ह्या विषयावरची चर्चा संपूर्ण होणार नाही.

अनुभवावरून वा वाचनानं माणूस हळूहळू आपली प्रगती करत करत सध्याच्या अवस्थेपर्यंत पोचला आहे. आणि माणसाचंच रक्त ढेकणांच्या अंगात खेळत असल्याकारणाने ढेकूणसुद्धा हळू-हळू आपली प्रगती करून घेतील अशी भिती वाटत आहे.

पूर्वी—म्हणजे फार पूर्वी श्रीपाद कृष्णांनी ढेकणांवरचा तो सुप्रसिद्ध लेख लिहिला नव्हता; तेव्हा ढेकूण आपले (बाकी आपले खरेच!) सरळ साध्या धोपट-मार्गानं चालायचे (चावायचे)! पुढे श्रीपाद कृष्णांनी ढेकणांवर लेख लिहिताना ढेकूण म्हणे भितीवरून सिलिंग्वर जातात व तिथून खाटेवर उडी मारतात आणि जीवावर (अर्थात् खाटेवर झोप-णाऱ्यांच्या) उदार होऊन लढतात, असं लिहिलं. अन् झालं! तो लेख अतिशय गाजला. सर्वांनी तो वाचला. त्या सर्वांना ढेकूण चावले. आणि त्या लेखातल्या एक एक कल्पना ढेकणांच्या अंगात शिरल्या.



त्या दिवसापासून मग ढेकूण भिंतीवर चढून उडी मारण्याची ट्रिक चालवूं लागले पुढें लेखकांऐवढेच टीकाकार तयार होऊं लागले. त्यांनी मराठी साहित्यांत फारसा दम नाही हे सांगून टाकलं! टीकाकारांचं हे म्हणणं लोकांनी वाचलं. आणि मग त्या लोकांना ढेकूण चावले. अन् त्यांनाहि कळलं कीं मराठी साहित्यांत फारसा दम नाही. त्यामुळें पुढच्या एक दोन पिढयांमध्ये (म्हणजे आपल्या एक दोन पिढ्या, ढेकणांच्या किती पिढ्या माहीत नाही!) ढेकणांना जी माहिती मिळाली त्यावर ते विश्वासच ठेविनासे झाले. नाहीतर आज मोठा बिकट प्रसंग ओढवला असता. गनिमीकाव्याबरोबरच ढेकूण जेट्स् घेऊन आले असते. पण तो प्रसंग टळला. आणि याचं सारं श्रेय टीकाकारांना आहे. आणि हे सारं श्रेय टीकाकाराना मिळवून देण्याचं श्रेय माझं आहे. (इकडे लक्ष देण्यांत येईल का?) तर अशा रीतीने ढेकूण जेवढया गोष्टी शिकले असते तेवढया शिकले नाहीत, ही आपल्यावर आपल्या सोबत्यांनी दाखवलेली मेहेरबानीच आहे.

ढेकूण हा फ्रेंड् इन् नीड् नसून फ्रेंड् इन् 'भीड' आहे. जिथे 'भीड' आहे तिथे हा येऊन भिडलाच समजा आपल्याला!

माणसानं दिवसांत दोन तास म्हणजे एक बारांश जरी वेळ प्रवासांत खर्च केला तरी त्या दोन तासांतल्या गर्दीत देखील माणसाचे हे नामांकित सोबती त्याची अक्षरशः पाठ सोडत नाहीत. जीवनांत म्हणे संकटं एकदम येतात. माणसाचे हे नामांकित सोबतीहि एकदमच चाल करून येतात. जीवनांतला सारा वैताग सेंट्रल रेल्वेच्या ठाणा ते दादर प्रवासांत माणसाला चाटून जातो. अन् त्या अर्थानं जीवन हा एक प्रवास आहे. आणि ढेकूण हे आपले सोबती आहेत. हे सोबती माणसाला झोपेत देखिल कशी साथ देतात हेहि सर्वश्रुत आहे.

आपल्या ह्या सोबत्यांवर झालेल्या अलिकडल्या प्रयोगांत असं आढळून आलं कीं हे वर्षभर कांहीं न खातां पिता जिवंत राहूं शकतात. हा आपल्या सोवत्यांचा गुण मात्र आपण आतां उचललाच पाहिजे हो! अन्नप्रश्न सोडवायला जाम मदत होईल त्यामुळें!

आपल्या सोवत्यांची आणखी वदनामी म्हणून असं म्हणतात कीं, यांच्या संगतीनं हिरा भंगतो. यांच्या संगतीत सोन्यासारखी माणसं देखिल भंग पावतात तर हिऱ्याचं हो काय? तरी पण हा हिरा भंगण्याचा प्रयोग मात्र करण्यासारखा आहे! हा प्रयोग करण्यासाठीं मी पुढाकार घेणार आहे. माझ्याजवळ ढेकूण तयार आहेत. आता फक्त हिरा मिळायची मी वाट पहातो आहे! जसे न मागतां मला ढेकूण मिळाले, तसा हिरा मिळेल अशी मी आशा वाळगून आहे. इकडे कुणी लक्ष देईल काय? असं मी लिहिणार होतो. पण परत म्हटलं नको. इकडे कुणी लक्ष दिलं नाही तरच बरं होईल.

ढेकूण हे आंतल्या गाठीचे (गादीचे) गनिमी काव्यातले मात्तवर सोवती सोडले (म्हणा आपण पुष्कळ सोडूं, ते मात्र आपली पाठ सोडणार नाहींत!) तर डांस हे विमान दलातले लढवय्ये सैनिक आहेत. एखाद्या सैन्याप्रमाणे मोठ्या तांड्यानिशी आपापल्या संगिनी तोंडी घेऊन उतरणारे हे पॅराट्रूपर्स आहेत. त्यांच्या हालचाली आपल्याला दिसतात पण त्याविरुद्ध काहीं करेपर्यंत डांस आपल्यावर तुटून पडतात. ह्यांच्या चढाई विरुद्ध आणि विमान हल्ल्यांविरुद्ध जंतुनाशकांचा फवारारुपी अॅन्टी एअरक्राफ्ट् गन्स्चा मारा करण्याची प्रथा आहे. अर्थात् ह्या फवाऱ्याचा तसा काहीच फायदा होत नाही. (नाही म्हणायला जंतुनाशक बनवणाऱ्या कंपनीचा फायदा होतो!) फवारा मारायला सुरुवात करताक्षणीच सर्व डांस–सैन्य खुर्चीखाली किंवा फवाऱ्यापासून दूर छत्तावर जाऊन बसतं. काही वेळातच फवारा खाली बसतो आणि हे सारं लपलेलं डांस-सैन्य आपल्या अंगावर वसतं! आपण आधी डांसाना कंटाळतो मग त्या डांसाच्या जंतुनाशक फवाऱ्यांना कंटाळतो. डांस अंती विजयी ठरतात. 'अंती विजयी ठरूं' अशा अर्थाचं गाणं ते डास गुणगुणतच हल्ला करत येतात. आपल्याला डांसांची भाषा कळत नाही म्हणून, नाहीतर माझं म्हणणं सर्वांना पटलं असतं. आपली इच्छा असो वा नसो आपल्या सदैव सान्निध्यांत राहूं इच्छिणारे डांस हे आपले सोवती आहेत. डांस आपल्या श्वासोच्छ्वासातल्या कार्बन् डाय् ऑक्साइड् वायुच्या वासानं आपलं अस्तित्व लगेच ओळखतात आणि आपल्यावर हल्ला करून येतात. आपण बोलवूनहि न येणाऱ्या सोवत्यांपेक्षां आपण न वोलवतांहि आपल्या नुसत्या वासानं येणाऱ्या आपल्या ह्या नामांकित सोवत्यांची आपण कदर केली पाहिजे! तुम्ही मला डांस नसणारं गांव द्या मी तुम्हाला अर्धं राज्य देतो. तुम्ही म्हणाल अर्धं राज्य कुठून देणार? पण तुम्ही मला डांस नसणारं गांव तर द्या मी अर्धं राज्य नाहीतर निदान अर्धं रेशन देईन. आजकाल अर्ध्या राज्यापेक्षां अर्ध्या रेशनची किंमत जास्त आहे हे मान्य व्हावं! अंधारात वा प्रकाशांत, जागेपणी वा झोपेत आपल्याला साथ करूं इच्छिणाऱ्या आपल्या ह्या नामांकित सोबत्यांकडे आपण लक्ष दिलं पाहिजे. नाहींतर ते आपलं लक्ष (आणि रक्तहि!) खेचून घेतील! तुम्ही तोंडावर पांघरूण घेऊन काळोखांत झोपलांत तरी तुमचा हात किंवा पाय पांघरुणाबाहेर यायचा अवकाश डांसांनी हल्ला चढवलाच म्हणून समजा. यांना काळोखांत देखिल दिसतं की काय कोण जाणे? सबंध दिवसांत कधी कधी डांस रात्रीच्या हल्ल्याची पूर्व तयारी म्हणून विश्रांती घेत असतात. अशा वेळी माशी हा प्राणी हजर होतो. सूर्यानं पाहिला नाही असा जगांत एकहि पदार्थ नाही. त्याचप्रमाणे माशी बसली नाही असा जगांत एकहि खाद्यपदार्थ नाही असं म्हणतां येईल. तुम्ही कोणताहि पदार्थ उघडा ठेवा. क्षणार्धांत माश्या हजर होतील.





(खरं म्हणजे हजार होतील!) थंड हवेच्या प्रदेशात अथवा बर्फमय ठिकाणी माशा नसतात असं म्हणतात. पण यावर माझा बुवा विश्वास नाही. माशी हा पदार्थ जगांतल्या कसल्याहि पदार्थावर बसेल! उद्यां कुणी सांगत आलं कीं त्यानं शेगडीतल्या धगधगत्या निखाऱ्यावर माशी बसलेली (आणि उडलेलीहि) पाहिली तरी खोटं वाटणार नाही! आणि दुसऱ्या कुणी सांगितलं कीं त्यानं बर्फावर माशी पाहिली तरी ते खरं मानीन!. उत्तर ध्रुवावर जाऊन जरी एक किलो साखरेचा डबा उघडा ठेवला तरी मला खात्री आहे क्षणांत तो माशांच्या (माशीचं अनेकवचन) थव्यानं भरला जाईल! (हाहि प्रयोग करून पाहाण्यासारखा आहे. अर्थात् ह्या प्रयोगांतलं उत्तर ध्रुवावर जाणं हे सहज शक्य आहे. परंतु एक किलो साखर मिळवणं त्याहिपेक्षां कितीतरी पट कठीण आहे हे काय सांगायला हवं? तर आपला हा सोबती आपल्या खाद्यपदार्थांचीहि अशी सोबत करत असतो. आपल्या ह्या सोबत्याची आणखी एक आवड म्हणजे आपण दुपारी झोपण्याचा प्रयत्न करत पडलो की आपल्या गालावर, तोंडावर येऊन बसणं! माशांचा हा त्रास आपल्याला रविवारी दुपारी अथवा सुट्टीच्या दिवसात जास्त जाणवतो. आपण माशांवर वैताग वैताग वैतागतो. पण आपल्याला झोपू न देण्यांत, आपल्या अंगी आळस भरूं नये एवढीच एक सदिच्छा माशा बाळगत असतात! माशांना चावायला सोंड नसते आणि त्याना रात्री दिसत नाही, हे परमेश्वरानं मानवावर दोन म्हान उपकार करून ठेवले आहेत!

ज्यांना चावतां येतं आणि रात्री दिसतंहि असे आपले नामांकित सोबती म्हणजे उंदीर! हा प्राणी आपल्याला सहसा चावत नाही. पण घरांतलं याचं अस्तित्त्व मात्र आपल्याला चावत राहतं! दिवसा उंदीर कुठे रहातात हा संशोधनाचा विषय होऊं शकेल. रात्रीहि आपण दिवा लावायचा अवकाश क्षणांत आपले हे लाजाळू सोबती गायब होतात! मूर्ख माणूस घर बांधतो आणि शहाणे त्यांत रहातात असं म्हणतात. तर ह्या रहाणाऱ्या शहाण्यानाहि मूर्ख बनवून त्यांच्या घरांत आपले हे सोबती नाचतात. नाचण्यावरून आठवलं. हिन्दी सिनेमांतले नाच बघून असं वाटूं लागलं आहे कीं मराठीतला नंगानाच हा शब्द जुना आणि निरुपयोगी आणि म्हणून टाकाऊ होणार आहे! नुसतं नाच म्हटलं की झालं! आणखी वेगळा शब्द कशाला? उंदीर मारण्याच्या भानगडीत कुणी पडू नये. कारण त्यात बऱ्याच कपबश्या आणि तत्सम फुटणेबल् चिजा आणि मारणाऱ्याचा देह घसरून पडण्याचा जास्त संभव असतो! आपण आपला आहार बदलला पाहिजे. उंदीर खाण्यास आपण सुरूवात केली पाहिजे असं नुकतंच कुणी तरी मंत्री सांगत होता. सामान्य माणसानं पैसा सोडून सर्व खाल्लं तर आपल्या देशा पुढचे प्रश्न सुटतील हे एक जनरल् विधान मान्य केले पाहिजे. आपल्याला उंदीर खायला सांगितलं याचं फारसं आश्चर्य वाटणार नाही.

आपले हे सारे नामांकित सोबती आपल्याला हवं असो नसो आपल्या जास्तच जास्त सन्निध राहून आपल्याला सोबत करण्याची सदैव पराकाष्ठा करत असतात. आपण त्यांच्याकडे लक्ष दिलं पाहिजे. नाहींतर कोणत्याहि क्षणी ते आपलं लक्ष स्वत:कडे वेधून घेतील.

जीवन हा प्रवास आहे हे मान्य केलं तर हे सारे आपले सोबती आहेत हे मान्य व्हावं. आणि हे मान्य झाल्यावर हे सारे नामांकित सोबती आहेत हे मान्य व्हावं!

• • •




-अनंत मनोहर

**ऑगस्ट** १९६६ ची ती एकवीस तारीख होती.

पेकिंगपासून जेमतेम पन्नास मैलांवरच्या त्या गांवात, कम्यून-मधल्या रेडिओने ही बातमी दिली तेव्हा कम्यूनमधलं काम ऐन रंगात आलं होतं.

ली पोनं घणघण घंटा वाजवली. अवेळी वाजलेल्या घंटेचा तो प्रदीर्घ नाद कम्यूनमध्ये घुमला. कामगारांनी हातातलं काम चटाचट आवरलं आणि ऑक्टोबर क्रांतीचा व माओचा जयजयकार करीत करीत सभास्थानाकडे पावलं वळवली. बहुधा पेकिंगहून खास संदेश आला असावा. चेअरमन माओनं "मोठ्या उडी"चा दिलेला ( Big leap ) संदेश हाताहातांनी झेलला जात होता. तो संदेश सांगण्यासाठी सभा असावी बहुतेक. पिकावं-फावडी जागच्या जागी गेली. पाटातल्या पाण्यात हात धुवून ते निळ्या पँटला पुसत पुसत कामावर निघाले. विशीच्या आतले तरुण झरझर चालत होते. त्यांच्या मागोमाग इतर होते.

ली पोनं साऱ्यांकडे नजर टाकली. सभास्थान भरले होते. टेब-लावर माओचा ब्रॉंझचा अर्धपुतळा होता. भिंतीवर छायाचित्रे होती. मुख्यतः माओची. शेती करणारा माओ, नांगर ओढणारा माओ, मूठ वर करून भाषण करणारा माओ, Long March चा आघाडी-वीर माओ. दणकट शरीरयष्टीचा चिरतरुण माओ छायाचित्रां-तूनहि त्यांच्याकडे रोखून पहात होता. ब्रॉंझचा माओचा अर्धपुतळा समोर पाहात होता. ब्रॉंझची ती चिमुकली पण दणकट मूठ उगार-लेली होती, उंचावलेली होती. ओठ विलग झाले होते. "क्रांतीच्या पुत्रांनो" अशी साद घालीत बोलायला ते ब्रॉंझचे ओठ अतिउत्सुक झालेले दिसत होते.

ली पोनं मूठ उंच केली. क्रांतीचा जयजयकार केला. त्याची घोषणा जमावानं उंचउंच आवाजात झेलली. ली पोनं चेअरमन माओचा जयजयकार केला आणि क्रांतिपुत्रांकडे पाहात म्हटलं,

"कॉम्रेड्स्, चेअरमन माओ यांचे दिव्य शब्द पुन्हा पुन्हा जगाच्या प्रत्ययास येत आहेत. जगात खरा धर्म एकच आहे. कॉम्रेड माओने शिकविलेला साम्यवाद. जगात देव एकच आहे. ऑक्टोबर क्रांतीने आणलेला साम्यवाद. जगात धर्मग्रंथ एकच आहे. कॉम्रेड माओची वचने. तीच जगाचे रक्षण करतील. जगाचे चक्र आता वेगान्वित झाले आहे. ते प्रमाथी बादळ सुरू झाले आहे. या प्रभंजनात आता साऱ्यांचा बळी जाणार आहे. सर्व धर्म, सर्व पंथ, सर्व खोटी संस्कृति, भांडवलशाही समाजरचना, सुधारणावादी देश यांची राखरांगोळी उडणार आहे."

वाक्यावाक्याला चेअरमन माओचा आणि ऑक्टोबर क्रांतीचा जयजयकार होत होता. चेअरमन माओ, लिन पिआओ, चौ-एन्-लाय यांचा जयजयकार घुमत होता. ली पोचा करडा, रुंद आवाज संथपणे पुढे सरकत होता. चेअरमन माओचे तत्त्वज्ञान, भांडवल-शाहीवर टीका, व्हिएतनाममध्ये अमेरिकन सैन्याचा होणारा पराभव, सुधारणावादी राष्ट्रांवर आगपाखड या ठराविक वळणाने ली पो बोलत होता. आणि अखेर विशिष्ट क्षणी तो गरजला,

"कॉम्रेड्स्, चेअरमन माओच्या कृपाछत्राखाली आपली भाताची पिकं वाढत असताना, आपले कारखाने कमाल वेगाने उत्पादन करीत असताना, तिकडे त्या तुर्कस्थानमध्ये काल काय घडले ?

ऐका आणि विचार करा.

काल एका क्षणात हजारो घरे कोसळली, गांवेच्या गांवे बेचिराख झाली, सत्तेचा-पैशाचा बुलंद ताठा एका क्षणात जमीनदोस्त झाला. वार्तोसारखं गांवच्या गांव ठार झालं.'

वीस ऑगस्टच्या त्या भीषण भूकंपाचे वृत्त देतदेत लीपोनं साऱ्यांना वारंवार बजावलं, यापुढं साऱ्या जगात असंच घडणार आहे. साम्य-वाद हे सारं जग असंच ढवळून टाकणार आहे. राक्षसी, भांडवल-शाही जगाचा असा घणाघाती चक्काचूर होणार आहे....."

ली पोचे शब्द तरुणांनी झेलले. ली पोनं दिलेल्या घोषणांना प्रतिसाद दिला. मुठी वळल्या. ताडकन वर गेल्या. डोळे विस्फारले. कंठांच्या शिरा ताणल्या. आवाज उंच झाले. इतके, की ते चिरकले

**ऑगस्ट १९६६ ! कम्युनिस्ट चीनमध्ये सांस्कृतिक क्रांतीसाठी लालरक्षक पहिल्या प्रथम पुढे सरसावले..... नंतरचा सारा इतिहास ताजाच आहे. अगदी जून ६७ मधील आपलीही बेइज्जत...**

**त्या रक्षकांनी क्रांतीच्या आवेशात 'सेंट मेरी' चर्च आणि तेथील फादर नन्स यांची केलेली विटंबना...**

**आपल्याकडेही नक्षलबारीत ते भूत थैमान घालीत आहे. समाजवादी समाजरचना म्हणजे हेच कां अभिप्रेत आहे ?.... आपण ठरवू तसे, घडेल भविष्य आपलेच. म्हणून हा किस्सा.....**

आणि फाटले. नवं स्वप्न समोर साकारू लागलं. जगाचा विनाश. क्रांति. सरपटणारी, वेगानं चालणारी, गरगरून टाकणारी ती अखेरची क्रांति. परवा तर माओ हेच म्हणाला होता. लष्करी संचालनाच्या वेळी लष्करी पोशाखात आलेला माओ हेच गरजला होता. तर मग ते चालू झालं तर. भाईही, अखेर माओचे स्वप्न फुलू लागले. क्रांतीचे रणशिंग वाजू लागले. भांडवलशाहीच्या पापाचा घडा भरला. तर मग आता विनाश. भूकंप, ज्वालामुखी, अतिवृष्टि, अवृष्टि, भूक, रोग, जुलूम-जबरदस्ती, अन्याय, लूटमार, आणि अखेर क्रांति. भांडवलशाही अमेरिकेत. त्या इंग्लंडमधे. ऑस्ट्रेलियात. रशियात. भारतात. शेतकरी आणि कामगार यांचा उठाव. भाईहो, जगातील भाईहो, जागे व्हा, जागे व्हा, जागे व्हा, चिनी प्रजासत्ताकाचे कोटिकोटि बाहु तुम्हांला साथ देण्यासाठी उभारलेले आहेत.

आणि आता ली पो तेच सांगत होता.

सभा संपल्याची घंटा झाली तरी ली पोचे शब्द तरुणांच्या मनात घुमत होते, रेंगाळत होते. आणि सायंकाळी आपापले काम संपवून कामगार वस्त्यांकडे निघाले तरी ते शब्द मनात ताजे होते. दिवसभराच्या कामानं त्यांची शरीरं मरगळली होती. देह आंबले होते. क्रांतीच्या नांवाखाली रोजच्या दिढीने काम झाले होते. पोटात भुकेचा आगडोंब उसळला होता. तिकडे कम्यूनमध्ये भटारखाने घडाडले असतील. लाललाल जाड तांदुळांचा भात आणि सुक्या माशांचा वास असलेले कढण (सूप) तयार होत असेल. ठराविक पद्धतीचे अन्न ठराविक वेळी तयार होईल. तोंपर्यंत सायंप्रार्थना आटोपेल. पेटलेल्या जठराग्नीत ठराविक परिमाणाचे अन्न कोठल्याकोठे गडप होईल. तेवढ्यासाठी दिवसभराचं काम. आणि नंतरचं बौद्धिक. पेकिंगहून कोणी खास कार्यकर्ता आला असेल तर तो बौद्धिकाला हजर असेल. बौद्धिक आटोपलं कीं गटवार चर्चा. उद्याच्या कामाची चर्चा. आजच्या कामाचा अहवाल. चांगलं काम केल्याबद्दल एकाद्याचा गौरव. एकाद्याची कानउघाडणी. एकाद्याने केलेली आत्मटीका. माओच्या विचारांचे मंथन. भात आणि कालवणासाठी. पण उद्या हे सारे बदलेल. जगच मुळी बदलेल. पेकिंगची सीमा आज तिबेट ओलांडून नेपाळभूतानपर्यंत पोचली आहे. तेथून दिल्ली दूर नाही. कराची दूर नाही. तिकडे त्या भारतात आणि पाकिस्तानात, ब्रह्मदेशात आणि रशियात, कॅनडात आणि ब्राझीलमध्ये अन्न नुसतं फुकट जातं आहे. डोंगराएवढं अन्न. गहूं तांदूळ आणि हो ! साखर ! पांढरी पांढरी, रवाळ साखर. आणि मासे, आणि मास. कपडे—सुती, रेशमी, लोकरी, उनी आणि अर्धउनी. ऑस्ट्रेलियाची अफाट भूमि आणि कॅनडाची रिकामी शेती या सुपुत्रांची वाट पहाते आहे. लाल भात आणि कालवण. आज मिळणारे. पण भूक भागवणारे. देहाची खोळ जिवंत ठेवणारे अन्न.

वाटेतलं एक चर्च. रोज भेटणारं. कॅथॉलिक मिशनचं चर्च. पांढरं शुभ्र टुमदार पण डौलदार. किती वर्षांचं पण जसंच्या तसं राहिलेलं. पेकिंग बदललं, सूचौ बदललं. नानकिंग बदललं. शेतं गेली. त्यांच्या जागी कम्यून्स आली. इवलाली इवलाली जमीन गेली. शेतं जोडली गेली. मोठमोठी सामुदायिक शेतं आली. ती जुनाट घरं गेली. त्यांतल्या ऊबदार कँग्जसह गेली. घरां-



जवळची छोटी छोटी डबकी गेली. गांवाबाहेरचा तो ग्रामरक्षक देव. कुठं गेला कोण जाणे. पूर्वी तिथं देवापुढं मेणबत्त्या जळत होत्या. सुगंधी अगरबत्त्यांचा सुगंध देवालयाला व्यापून टाकी. तो सुगंध गेला. नैवेद्यहि गेला. सगळं बदललं. पण सेंट मेरीचं ते चर्च आजहि तसंच होतं. कबुतरासारखं डौलदार, इवलं आणि पाढरंशुभ्र. त्याचे ते निमुळते मिनार. दर्शनी लावलेलं घड्याळ आणि भोवतालची ती बाग. अस्मिता दर्शवणारी ती बाग. तिथं पिढ्यानुपिढ्या ऱ्होडोडेंड्रॉन फुलले. लिलीची नाजुक, पांढरी, लांब दांड्याची ही डोलणारी फुलं. या बोगनवेली. हे विनवासाचे मोठेमोठे गुलाब. या इंग्लिश वेली. अनामिक. फुलं येणाऱ्या, रंगाची उधळण करणाऱ्या या अनोख्या वेली. आणि हे लॉन ! हिरवळ. बारा महिने पसरलेली ही श्यामल हरित हिरवळ. आणि या गार्डन चेअर्स ! ! वेताच्या. गोलगोल. मोठ्या मोठ्या. आरामशीर. ऐसपैस. खानदानी. विलायती गोऱ्या साहेबाच्या या खुर्च्या.

सिस्टर फ्लॉरा हातातल्या खुरप्यानं बागेत काही काम करीत होती. तिनं रस्त्याकडे पाहिलं. समुद्रासारख्या निळ्यानिळ्या डोळ्यांनी पाहिलं. निळ्या पँट्स नजरेत भरल्या तिच्या. एकाच रंगाच्या. पुरुषांच्या आणि स्त्रियांच्याहि. स्त्री पुरुष भेद नाहीसा करणारे हे कपडे. ना रंग ना रूप. ना मापाचे. कां वागतात हे लोक असे ? माणसाचं हे बराकीकरण त्यांना स्वतःला खटकत नसेल का ? कुठं गेली ती फुलाफुलांची कापडं ? नाजुक, रंगीत, रेशमी, सुळसुळीत. झुळझुळीत. पुरुषांचे ते भरदार अंगरखे. तो कंबरपट्टा श्रीमंती दाखवणारा. भरजरी पोषाख. आणि त्या गांठ मारलेल्या शेंड्या ! पाठीपर्यंत पोचणाऱ्या ! आणि त्यांच्या मागून अदबीनं जाणाऱ्या त्या स्त्रिया !

सिस्टरनं खेदानं नजर वळवली आणि त्याच क्षणी कँगचं तिच्याकडे लक्ष गेलं. सिस्टर फ्लॉरा ! त्या देशातली ही स्त्री, जिथं भांडवलशाही आहे. जिथं रंग जमला जातो. जिथं काळ्या रंगाला बहिष्कृत ठेवलं जातं. सिस्टर फ्लॉरा ! गोऱ्या कातडीची बाई. निळ्या डोळ्यांची. काळ्यांकडे तुच्छतेने पाहणारी. काळे लोक आणि पिवळे लोक. पिवळे आणि निमगोरे. हबशी, आफ्रिकन, चिनी, जपानी साऱ्यांना एकाच तराजूनं जोखणारे हे गोरे लोक ! ! कँग तिच्याकडे पाहून तुच्छेतेनं थुंकला आणि अभावितपणे त्याच्या तोंडून शिवी गेली, "बूर्झ्वा. बूर्झ्वा." आणि कँगनं आपल्या सोबत्यांकडे पाहून क्रांतीचा जयघोष केला. बघता बघता पांचपन्नास तरुणांचा तो जमाव सेंट मेरी चर्चच्या गेटसमोर उभा राहिला आणि सिस्टर फ्लॉराकडे पाहून अर्वाच्य घोषणा देऊ लागला. माओचा जयजयकार, क्रांतीचा जयघोष आणि भांडवलशाहीचा निषेध. च्युंगनं गेटला जोराचा धक्का दिला. लिंग टॅननं गर्दीचा फायदा घेऊन एक दगड उचलला आणि नेम धरूनच चर्चच्या घड्याळावर भिरकावला. घड्याळ खळ्कन फुटलं आणि कांचा फाडकन फुटत खाली आल्या. सिस्टर फ्लॉरानं खुरपं खाली टाकलं आणि शांतपणे छातीवर बोटांचा क्रूस करून ती उभी राहिली. निश्चलपणे उभी राहिली. जमावाकडे पाहात. शांत. स्तब्ध.

तेवढ्यात मागून ली पोचा आवाज आला. ली पोनं कँग, च्युंग, लिंग टॅन यांच्याकडे हंसत पाहिलं. आणि मग साऱ्यांना वस्तीकडे जायला फर्मावलं. मग ली पो मोठ्या अदबीनं गेटशी गेला. मृदु आवाजात त्यानं सिस्टरला हांक मारली. मृदुपणानंच झालेल्या प्रकारावद्दल क्षमा मागितली. "आणि तुमचा धर्म क्षमा करीलच." ली पो म्हणाला "तुमचा धर्म मोठा क्षमाशील आहे. मोठा कनवाळू आहे. तुमचा तो कुमारिकेचा पुत्र, काय त्याचं नांव सिस्टर ? हो येशू..येशू तर मोठा क्षमाशील होता. आणि आणि त्याचा सद्धर्म सांगण्यासाठी तर तुम्ही इथं इतक्या लांब आलात. ही तुमची चर्चेस तर त्यासाठी स्थापलीत." ली पो छद्मीपणानं हंसत म्हणाला, "मला खात्री आहे सिस्टर, तुम्ही या अज्ञ मुलांना क्षमाच कराल. आणि तीहि हा वेडेपणा करणार नाहीत." नम्रपणानं तिला पुन्हा अभिवादन करून ली पो गेला.

सिस्टर फ्लॉरा पुतळ्यासारखी उभी होती. तिचे ओठ थरथरत होते आणि पांढरे पडले होते. तिचं शरीर थरथरत होतं. संतापानं आणि भीतीनं. मग हळू हळू सिस्टर फ्लॉरा आत गेली. मेरीच्या पुतळ्यासमोर गुडघे टेकून बराच वेळ बसली. सिस्टर नॅन्सी, सिस्टर लॉरा, सिस्टर पॅट्रीसिया आणि फादर जॉन यानी खूप प्रयत्न करूनहि फ्लॉरा बराच वेळ बोलली नाही.

पन्नास वर्षांपूर्वी सिस्टर फ्लॉरा इथं आली... थेम्स शांतपणे वाहत होती. थेम्सच्या थंड–शांत प्रवाहाकडे पाहात फ्लॉरानं विचार केला होता. अठरा वर्षांची कोवळी फ्लॉरा थेम्सच्या काठी निपचल बसली होती. दूर कोठेतरी तिचा एडवर्ड वीरनिद्रा घेत पडला होता. निळ्या डोळ्यांचा तो प्रेमळ शिलेदार अखेरची निद्रा घेत होता. कवीतरी हे जर्मनांबरोबरचं युद्ध संपेल. एडवर्ड परत येईल. पुन्हा ऑक्सफर्डला जाईल. तिथं त्याचे वृद्ध प्राध्यापक



आपल्या छायांची वाट पाहात बसले आहेत. एडवर्ड तिथं शिकेल. साहित्याचा अभ्यास करील. आणि मग कधीतरी दोघांचं छोटं घरकूल उभं राहील. आज अगदी दुपारपर्यंत रंगवलेलं स्वप्न होतं हे. कालच तर तिनं एडवर्डला मोठ्ठं मोठ्ठं पत्र पाठवलं होतं. आणि एक चित्र. तिनं काढलेलं. ब्लॅकबर्ड नरमादीचं नाजुक चित्रं. एका ओकच्या नाजुकशा डहाळीवर एकमेकांना चिकटून बसलेलं ते युगुल. पण आज त्यातला नर निघून गेला होता. थेम्सच्या शांत स्तब्ध पाण्यात ती वाकून पाहात होती. पुसलं गेलेलं चित्र रेखून पाहात होती. आणि नंतर ती इथं पोचली होती. सेंट मेरी चर्चमध्ये पेकिंगजवळच्या या छोट्या खेड्यात. उमलतं तारुण्य काळ्या कपड्यात बंदिस्त झालं. हृदयाची कपाटं फोडून उचंबळून बाहेर पडणारी प्रीति इथं मेरीपुढं शांत झाली, वठून गेली. जोगिणीच्या जीवनात तो उत्साह मर्यादित झाला. मन अनावर झालं कीं हाती बायबल येई. मध्यरात्री एडवर्डचा स्पर्श झाला की रात्रभर येशूपुढे मेणवत्ती जळे, येशूचे पाय धरून प्रार्थना करीत उभी रात्र संपे. कधी सिस्टर नॅन्सी जागी होई. ती फ्लॉराला जवळ ओढून घेई आणि पाठीवर थोपटल्यासारखं करून पुटपुटे "Child, poor child." "गरीव बिचारी." मग कधीतरी वृत्ति शांत होत. या अनोख्या जीवनात मिसळत. घरा-घरातली उघडीनागडी मुलं धाव घेत, तेव्हा फ्लॉरा सिस्टर बने. सिस्टर इथं घडली, आकाराला आली. इथं तर ती पुष्परचना शिकली. इथल्या लोकांचं अन्न तिनं खाल्लं. इथल्या लोकांची भाषा ती शिकली. त्यांच्या घराघरातल्या सुखदु:खाच्या कहाण्या तिनं ऐकल्या. या लिग टॅनच्या वडिलांचं अफूचं व्यसन तर तिनं सोडवलं. मन वळवून. मन जिकून. इथल्या जीवनाचे रसरंग तिनं अनुभवले. वर्षाच्या पहिल्या दिवशी कागदी कंदिल झाडाझाडांना लटकत. भूदेव, बुद्धदेव, अग्निदेव, तो ड्रॅगॉन, ते सर्व, त्या हजारो देवता, ती भुतेखेते, ते नैवेद्य... सगळं तिला इथं कळलं. या माण-सांना माणसं बनवायला तर ती आली होती इथं. शेली, कीट्स्, बायरनचा सरे प्रांत सोडून ती इथं आली होती. तिचं ते चिमुकलं गांव. त्यातून समांतर धांवणारे रस्ते. ती भोवतालची शेतं. तिचं चिमुकलं घर. पांढऱ्याशुभ्र, थोराड गाई. कुरणांवरून बागडणारी हुंदडणारी त्यांची वासरं, चेतोहर वसंताचं वैभव, झुळझुळू वाहणारे जलौघ, आणि हिवाळ्यातली ती हिमवृष्टि. स्केटिंग. तो बर्फाचा माणूस. आणि फादर ख्रिसमस. नाताळबावा. बाबालोकांना त्यांच्या टांगलेल्या मोजातून भेटी ठेवून जाणारा तो दयाळू वृद्ध.

फादर जॉन तिच्याकडे करुणेनं पाहात होते. पंचाहत्तर वर्षांचा तो वृद्ध तिच्याकडेच पाहात होता. जॉननं खांद्यावरचा झगा जरा सारखा केला. पुन्हा एकदा सिस्टर फ्लॉराकडे पाहिलं. या चमत्का-रिक देशात वठून गेलेल्या फ्लॉराकडे तिच्याहून जास्तच वठ-लेल्या फादर जॉननं पाहिलं. त्याचे ओठ काहीतरी पुटपुटत होते. "तूं त्यांना क्षमा कर. हे आकाशातील बापा, हे आमच्या दयाळू बाप्पा, तूं त्यांचे अपराध पोटा:त घाल. मुली शांत हो. धीर धर. तो

सर्व पाहतो आहे. त्याची कृपा अगाव आहे, अपार आहे. त्याचा आत्मा सर्वशक्तिमान आहे." फादर येशूकडे पाहात विचार करीत होते.

किती गेला काळ ! किती बदलला काळ. आम्ही कां आलो इथं ? कां आलो या देशात ? प्रभू, अरे किती बदलला हा देश ! ही माणसं. अफूच्या तारेत गुंगलेली ही माणसं, कन्फ्यूशियसचं तत्त्वज्ञान उरीपोटी वागवलेली ही माणसं. शांत. स्तब्ध माणसं. इथं नव्हत्या शाळा. नव्हते दवाखाने. नव्हते कारखाने. इवलाली शेतं. इवलाली घरं. पिवळी छोटी माणसं. वर्षभर कष्टणारे शेतकरी आणि त्यांना लुबाडणारे ते कॅन्टन–शांघाय–पेकिंगमधले जमीनदार. वर्षातून एकदा घोडागाडी उडवीत येणारे. चाबकाच्या तडाख्यानं खंड गोळा करणारे. त्यांचे ते उंचउंच वाडे. त्या भोवतालचे ते पक्के दगडी कोट. देखभाल करणारे आणि इतरांशी उर्मटपणानं वागणारे नोकर. त्या दासी. धन्याची शय्यासोबत करणाऱ्या. धन्याची, त्याच्या भावांची आणि नुकत्याच वयात आलेल्या धन्याच्या मुलांची. आणि त्या चोथा झालेल्या दासी. दान म्हणून देऊन टाकलेल्या दासी. त्या स्वामीनी. लठ्ठ देहाच्या. केवळ कॅंगवर लोळत पडलेल्या. आणि त्या उपपत्नी. पैसे मोजून विकत घेतलेल्या. नाजुक, सुंदर, कोवळ्या. चांदीच्या मुठीच्या हस्तिदंती फण्या वापरणाऱ्या. नृत्यगान करणाऱ्या त्या भोगस्त्रिया. अन्यायाने जमविलेल्या धनाचा भोग घेणाऱ्या स्त्रिया. ते वाडे आणि त्यातील गुप्तधनांचे साठे. तळघरं. भुयारं. कॅंगखालची जागा. जाडजाड भिंतीतील गुप्त जागा. त्यातून ठेवलेलं सोनं. रत्नं. रौप्यमुद्रा. गहाणखतं. करारमदार. कर्जचिठ्या, ताम्रपट, ते गुप्तधन आणि ते वाडे. ती शहरं. भोवती वेस असलेली शहरं. वनिक पुत्रांचे वाडे आणि त्यांची चैनीची ठिकाणं. अफूचे अड्डे. चहाची दुकानं. वेश्यांच्या माड्या. जुगाराची मोहस्थळं. मोठमोठी दुकानं. संपत्तीची उलाढाल. नाना प्रकारच्या सामानानी भरलेल्या वखारी. रस्त्यातून जाणारे आशाळभूत डोळ्यांचे भुकेलेले गरीब लोक. ते धर्मगुरु आणि त्याना धन देणारे सामान्य लोक. या गर्तेतून याना बाहेर काढण्यासाठी आम्ही आलो. कसं विसरले हे लोक ? कसं विसरले जपान्यांचं राक्षसी आक्रमण ? त्यांनी केलेले अन्याय ! अत्याचार ! त्यांच्याकडून इथल्या कोवळ्या स्त्रिया भोगल्या गेल्या. राक्षसीपणानं भोगल्या गेल्या. बापादेखत लेक, मातेदेखत तिची कोवळी बारा वर्षांची मुलगी, पतीदेखत पत्नी, पुत्रादेखत माता इथं भोगल्या गेल्या. रस्त्यातून, घरातून, अंगणातून, जंगलातून रक्ताच्या थारोळ्यात भोगल्या गेल्या. भोगल्या जात असतां मरण पावल्या. ओरबाडले जात असता ओठ फाटले. त्यावेळी याना आम्ही धीर दिला. यांचे अश्रू पुसले. यांचं रक्त पुसलं. यांच्या जखमा हाताळल्या. कसं कसं विसरले हे लोक सारं ?

फादर जॉननी येशूकडे पाहिलं. गळ्यातल्या क्रॉसला हात लावला. खांद्यावरचा झगा चिमटीत वरून सारखा केला. फादर खिडकीशी गेले. बाहेर पाहू लागले. समोरच्या बैठ्या इमारतीकडे पाहू लागले. इथं होती एक शाळा. पूर्वी होती. नुकतीनुकती वर्षापूर्वी होती. एकेकाळी बरोबर अकरा वाजता रोज नेमानं घंटा घणघणे. फादर जॉन, फादर माल्कम, फादर रेनॉल्ड्स्, सिस्टर नॅन्सी, सिस्टर ऑफिलिया अंगावर गाऊन चढवून तिथं जात. मुलांना शिकवीत. अगदी नुकता नुकता पायथॅगोरसचा सिद्धांत त्या इमारतीत फादर जॉननी शिकवला होता. पायथॅगोरसचा सिद्धांत आणि बीजगणीत. युक्लिडची भूमिति आणि शेलीकीट्स्च्या कविता. Home they brought; her warrior dead तर बऱ्याच वेळा शिकवली. आणि Charge of the Light Brigade आणि Daffodils आणि ती नाजुक कविता I remember, I remember आणि ती आणि ती आणि ती. . . . आणि मेकॉले, आणि History! History of Great Britain. हेन्री – चार्लस्, पहिला – दुसरा – ऑलिव्हर क्रॉमवेल–मॅग्नाचार्टा.. The King can do no wrong! आणि ते अमर गीत, अमर गीत Rule Britanica, Britanica Rules The Waves!

गेली ती शाळा. गेली. काळाच्या निर्दय ओघात घंटेचा आवाज लुप्त झाला. नकाशे गुंडाळले. पृथ्वीचे गोल कपाटात गेले. वाचनालयांची कपाटं बंद झाली. गाऊन घडी करून कपाटात जाऊन बसले. फादर माल्कम स्कॉटलंडला गेला. रेनॉल्डस् तिकडं कोठें यॉर्कशायरमध्ये असेल. सिस्टर ऑफिलिया तर केव्हाच मरण पावली.

यांगत्सीच्या प्रवाहाकडे पहात थेम्सची आठवण काढीत मरून गेली. एका जबरदस्त प्रमाथी लाटेनं हे सार कुठच्या कुठे गेलं.

कधी आली ही लाट ? जपानचं राक्षसी आक्रमण तर परवापर्यंत होतं. पिवळी माणसं या देशाच्या पिवळ्या माणसांना परवापर्यंत मारीत होती, चिरडत होती. पण एक प्रमाथी प्रभंजन आलं आणि हा देशच वदलला. जपानी गेले. नेस्तनाबूत झाले. या देशातून फेकले गेले. तिकडे दूर मॉस्कोच्या कडक थंडीत नव्या विचारांचं रोपटं रुजलं आणि ते बी इथं आलं. ही मुळी माणसंच वदलली. साऱ्या साऱ्यांचा मुखवटाच बदलला. चँग-कै-शेक तडीपार झाला आणि पेकिंग- सुचौ - नानकिंग बदललं. घडाघडा तड कोसळले. अभेद्य वाडे छिन्नविच्छिन्न झाले. संपत्तीचा ओघच बदलला. जमिनी गेल्या, कर्ज बुडाली, वाडे फुटले, भोगदासी वाटून घेतल्या गेल्या, सोनं–रत्नं–रुपं–जडजवाहीर लुटलं गेलं, भरलेली कोठारं रिती झाली, ताम्रपट भग्न झाले, देवळ कोसळली, जमीनदार–सरदार–देशोवडीस लागले.

किती बदलला हा देश. रयाच पालटली. शेतं गेली. कम्यून्स आले. कारखाने घडघडू लागले. उत्पादनाचा वेग वाढू लागला. संहाराची, साऱ्या जगाच्या संहाराची भूक वाढली. जे जे सुंदर, जे जे सुरूप, जे जे नाजुक, जे कालात्मक, ते सारं घणांखाली फुटलं. कला गेली. चित्र-शिल्प-काव्य-नाट्य-नृत्य संपलं. इथली माणसंच मुळी वदलली.

फादर जॉन कितीतरी वेळ खिडकीशी उभे होते. पांढरंशुभ्र चांदणं पडलं होतं. मंद शीतल वारा सुटला होता. साऱ्या अवकाशात गारठा भरत होता आणि फादर मूकपणे उभे होते. पाहात होते, विचार करीत होते, हे गणित सुटतंय का. कां राहिलो आपण इथं ? कां राहिलो या देशात ? जिथं संहाराची वेडी भूक आहे तिथं ? जियं माणूस माणूसच नाही तिथं ? येशूचा तो संदेश मी यांच्यापर्यंत कसा पोचवू ? मेरीचं दुःख मी यांना कसं सांगू ? आकाशपाताळ बदलून टाकणाऱ्या या माणसांना ते येशूचं तत्त्वज्ञान कसं समजावू ? त्याच्या अश्रूंचं तत्त्वज्ञान यांना कसं कळावं ? जे येशूच्या अश्रूंनीं सांगितलं. जे येशूच्या झरणाऱ्या जखमांतून उमटलं. जे क्रूसाला चिकटलं. जे गुहेतून प्रकट झालं. जे सागर तरलं. या भूमीत ते बीज कसं जगावं ? जिथं आता देव नाही, धर्म नाही, माणूसच उरला नाही जिथं. जियं मातेचं प्रेम नाही, जियं पित्याची करुणा नाही, जिथं कोणी कोणाचा पुत्र नाही, बंधु नाही, मित्र नाही, जिथं करुणा नाही, माया नाही, ममता नाही, जियं जखमेनं जखम होत नाही, दुःखान आतडं कळवळत नाही, वेदनेनं अश्रू उभे राहात नाहीत, जिथं त्याग नाही दान नाही !

पेकिंग. महत्त्वाचं केंद्र झालेलं पेकिंग. गेले आठ पंधरा दिवस पेकिंग सावध झालं होतं, साशंक बनलं होतं. मनं अधीर होती. वृत्ति भयभीत होत्या. चेहरे प्रयासानं स्वच्छ ठेवलेले होते पण डोळे भयचकित झाले होते. रस्त्यानं चालताना, घरात वावरताना, कचेऱ्यातून, कारखान्यातून, चर्चावर्गातून माणसं कानोसा घेत वावरत होती. चायना न्यूज एजन्सीचं ताजं ताजं वत्त मिळवण्यासाठी लोक घडपडत होते. लाल चौकातली भित्तिपत्रकं काळजीपूर्वक वाचीत होते. रेडिओ पेकिंगवरून प्रक्षेपित होणारा शब्दन्‌शब्द तपाशीत होते. वारा पडला होता. क्षितिज स्वच्छ होतं. पण ही शांतता भीतिदायक आहे. सूचक आहे. वादळापूर्वीची शांतता आहे ही. काहीतरी घडणार आहे. काहीतरी भयानक घडणार आहे. अनपेक्षित अकल्पित असं घडणार आहे. कोणत्यातरी क्षेत्रात उलंथापालथ होणार आहे. कुठंतरी वर उलघाल चालू आहे. काहीतरी महत्त्वाची घटना घडणार आहे. युद्ध ? सर्वकंप युद्ध ? Total war? अणुयुद्ध ? अमेरिकेबरोबर ? रशियाशी ? कोठे ? व्हिएतनाम ? मंगोलियापलीकडे ? कोरिया? फोर्मोसा ? इंडोनेशिया–मलेशिया ? नेपाळ भूतान ? की शुद्धिकरण घडणार आहे ? सामूहिक कत्तल ? की एकाद्या फार मोठ्या नेत्याचं उच्चाटन ? की एकादी घटना अगोदरच घडली आहे ? काही माओचं ?.. ते तर नव्हे ? पण परवा तर...? की यंदाहि उत्तरेकडे पिकं बुडाली आहेत, त्या उपासमारीची ही पूर्वतयारी ?

लोक सावध होते. चाहूल घेत होते.
आणि ते घडलं.

अध्यक्ष लिऊ–शाओ–ची, क्रमांक दोनचा हा नेता आता सुधारणावादी ठरला. क्रमांक दोनवरून खाली ढकलला गेला. सातव्या क्रमांकावर गेला. चाऊ पुन्हा पूर्वपदावर आला आणि लिऊची क्रमांक दोनची जागा लिननं घेतली. अधिकृतरीत्या घेतली. पीपल्स डेली मधले बडे लोक बडतर्फ झाले. चायना न्यूज एजन्सीमध्ये खूप उलथापालथी झाल्या. पेकिंगचे मोठे अधिकारी स्थानभ्रष्ट झाले. अधिकाऱ्यांच्या नव्या याद्या प्रसिद्ध होऊ लागल्या.




साला चेंडू कसा गेला ! आँ...

लष्कर आणि पक्ष यांचे नवे संबंध प्रस्थापित झाले. मॉस्कोवर अधिक भडक झोड उठवण्यात आली. सांस्कृतिक शुद्धीकरण सुरू झाले.

आणि प्रथम ढवळन निघाले पेकिंग. त्या प्रसिद्ध लाल चौकात हजारो रेड गार्ड्स् जमले. रक्षक. संस्कृतीचे रक्षक. कोवळे कोवळे रक्षक. जेमतेम विशी गांठलेले तरुण. लिननं त्यांना आशीर्वाद दिला होता. माओची त्यांच्यावर भिस्त होती. जीवनाची सर्व क्षेत्रे शुद्ध करायला हवी होती आणि ते काम रेड गार्डस् करणार होते. या अतिप्राचीन देशात, संस्कृतीच्या शिखरावर असलेल्या या देशात पाश्चिमात्य जीवन शिरलं होतं. ते वीज निपटायला हवं. निर्दयपणे. निर्घृणपणे. घराघरांतून, शेताशेतातून शुद्धि करायला हवी. आहार, पोशाख, साहित्य, संस्कृति, राजकारण तपासून घ्यायला हवं.

माथी फिरलेले ते हजारो कोवळे तरुण माओच्या आणि नवक्रांतीच्या घोषणेने वेडावले. बेभान झाले. घराघरात शिरले. भितींवरची कलात्मक चित्रे फाटली. तसबिरी खाडखाड आपटल्या. कांचा खळाखळ फुटल्या. कोणाच्या तंग विजारी, कोणाचे गरम कपडे, कोणाचे इंग्रजी पद्धतीचे कपडे अग्नीच्या स्वाधीन झाले. लांब केस छाटले गेले. पावडर-स्नो—क्रीमच्या बाटल्या फुटल्या. पुस्तकं रद्दीत गेली. ज्यानी विरोध केला त्यांना पोलिसानी ताब्यात घेतलं. माथी फिरलेल्या तरुणांनी स्त्रियांवर हात टाकला. जो जो भ्रष्ट वाटला त्याला अमानुष मारहाण झाली. आज पेकिंगमधे. उद्या कँटन पेटलं. परवा शांघाय. नंतर सूचौ. नंतर नानकिंग. यांगत्सीचं पाणी लाल झालं. होअँगहो रक्ताळल्या जिभांनी धावू लागली. पेकिंग-शांघायच्या घराघरात रस्त्यारस्त्यात संघटित होऊन लोकांनी प्राणपणाने प्रतिकार सुरू केला. रेड गार्ड्स् आणि लोक यांच्यात यादवी सुरू झाली.

फादर जोन्सना ते कळलं तेव्हा उशीर झाला होता. किनाऱ्यावर उभे असलेल्या जोन्स, जॉन, फ्लॉरा, फ्लॉवियांवर क्रांतीची लाट चालून आली होती. पलिकडचं क्षितिज दिसेनासं व्हावं अशी डोंगराएवढी लाट. जी भक्ष्याचा स्वाहाकार करूनच परतेल. जी अचूकपणे भक्ष्याच्या वेध घेईल. बळी घेईल.

शेकडो कोवळे तरुण सेंट मेरी चर्चसमोर जमले होते. बंद गेटवर घडका मारीत होते. गेट गदागदा हलवीत होते. चर्चच्या इमारतीवर दगडांचा वर्षाव करीत होते. उंच दगडी भिंतीवरून पलीकडे जाता येईल का, ते पाहात होते. काटेरी तारांचं कुंपण तोडण्याचा प्रयत्न करीत होते. फादर जॉननी तिकडे पाहिलं. छातीवर बोटांचा क्रूस करून ते उठले. सिस्टर फ्लॉरा, सिस्टर लॉरा यांच्याकडे करुणेनं पाहात उठले.

"मुलींनो, मला तिथं जायला हवं. प्रभू येशू त्याचा छळ करणाऱ्यांना सामोराच गेला होता. दगडांचा आणि शिव्यांचा वर्षाव होत होता तरी येशू त्यांना भेटायलाच गेला. मुलानो ही मुलं उद्या शांत होतील, त्यांच्या वृत्ति संथ होतील. आज आपण कसे वागत आहोत हे त्यांना आज कळणार नाही. उद्या कळणार नाही. पण ते कवीतरी त्यांना कळेल. मग त्यांना त्यांच्या या वर्तनाची लाज वाटेल. पण आज आपण त्यांना घाबरलो तर आपल्याला ते जन्मभर बोचेल. प्रभू येशूचा आपण व्यर्थ उपदेश घेतला असं वाटेल. प्रभूनं आपल्याला निर्भय बनवलं आहे."

फादर जॉन धीमेपणानं गेटशी आले. त्यांना पाहून लिंग टॅन पचकन थुंकला. वू लिननं त्यांना उद्देशून अपशब्द उच्चारले. फादर जॉननी शांतपणे हात वर उंचावला.

"मुलांनो, माझ्या लाडक्या मुलांनो. . . . "

पण त्या वेडावलेल्या तरुणांनी त्यांना बोलू दिलं नाही. "चालते व्हा. इथून चालते व्हा. तुमचे पांढरे पाय या देशात नकोत. जा. तुमच्या देशात जा." ते तरुण ओरडत होते, किंचाळत होते. "चालते व्हा, चालते व्हा इथून," दगड भिरकावीत शिव्याशापांची लाखोली वाहात ओरडत होते, "चालते व्हा. चालते व्हा."

"कुठं जाऊ मुलानो मी ? कुठं जाऊ हे घर सोडून ?" फादर जॉननी कळवळून विचारलं. "इतकी वर्ष राहिलो मी इथं. आता कुठं जाऊ या वयात ?"

"कुठंही. कुठंही जा आणि बरोबर त्या तुमच्या बायका घेऊन जा." लिंग टॅन म्हणाला.

"बायकाहि घेऊन जा. बायका म्हणा किंवा तुमच्या त्या ठेवलेल्या बाया म्हणा." चौ म्हणाला.

"ठेवलेल्या बाया काय आणि वेश्या काय. त्या ज्या कोणी असतील त्या घेऊन जा."

"इथं काय करायच्या त्या ?" वू लिन म्हणाला.

"आणि आता त्यांचा उपयोग तरी काय आहे ?" खदाखदा हंसत ते पोरसवदा तरुण म्हणाले, "करायच्या काय त्या म्हाताऱ्या? तुम्हीच तर आयुष्यभर वापरल्यात त्या. खुळखुळे झाले त्यांचे. खारकांसारख्या वाळक्या केल्यात त्यांना. तुम्ही आणि तुमच्या जोडीदारांनी. मजा मारलीत फादर तुम्ही. तुम्ही आणि तुमच्या जोडीदारांनी. फक्त चार पुरुष आणि आठ बायका. एका फादरला दोनदोन बायका.

"ए लिंग टॅन त्यापेक्षा असं म्हण दोघीदोघी एकेका फादरला भोगीत होत्या. एका नाण्याच्या दोन बाजू तशा दोघी बायका फादरला दोन बाजूंनी मिठी मारीत होत्या, पाळीपाळीने भोगीत होत्या."

"न्या, न्या त्यांना बरोबर. काही दम नाही त्यांच्यात."

"आणि ठेवल्यात तरी चालेल" मांडी दाखवीत लिंग टॅन म्हणाला, "एकदा आम्ही भोगून बघतो त्यांना."

"हो हो" दुसरा म्हणाला, "ठेवाच त्यांना."

"हो हो, एक म्हणाला," याना ठेवा आणि तुमच्या देशातल्या इतर बायकानाहि पाठवा इकडे. तिकडे म्हणे पुरुषच कमी आहेत सध्या. युद्धात मारले गेले ना ! पाठवा पाठवा त्या साऱ्यांना."

"पाठवा. इथंच पाठवा. त्या मेरीच्या साक्षीनें येशूच्या समोर भोगतो त्यांना."

अनुक्रमणिका








फादर जॉन गळ्यातल्या क्रुसावर हात ठेवून शांतपणे उभे होते. आतल्या बाजूला उभ्या असलेल्या सिस्टर्स थरथर कापत उभ्या होत्या.

"कसं बोलवतं हे तुम्हाला ?" फादर म्हणाले.

"बरोबर", लिंग टॅन दांत काढीत म्हणाला,

"हे बोलून दाखवायचं नसतंच मुळी. हे करूनच दाखवायचं असतं. चला रे, या फादरच्या देखत करूनच दाखवू या."

आणि ते तरुण गेटवर धडकू लागले. सिस्टर फ्लॉरानं घट्ट डोळे मिटून घेतले. फादर जॉन शांतपणे उभे होते. सिस्टर नॅन्सी मटकन खाली बसली. सिस्टर लॉरा आणि सिस्टर पॅट्रीसिया अवाक् होऊन उभ्या राहिल्या.

ली पो मुळे तात्पुरतं संकट टळलं तरी सतत चार दिवस आणि रात्र ते तरुण सेंट मेरी चर्चशी जमत होते. दगड भिरकावीत होते. गेटला धडका मारीत होते. गांवातलं कॉन्व्हेंट स्कूल जळलं. घराना आगी लागल्या. स्त्रियांवर हात टाकण्याचे प्रकार झाले. लुटालूट आणि जुलूम यांचा कहर उसळला.

सेंट मेरी चर्चचं लोखंडी गेट बंद होतं. चार दिवस ते उघडलंच नाही. मग माथी फिरलेल्या तरुणांनी विद्युत्प्रवाह तोडून टाकला. दगड मारून मारून खिडक्यांची तावदानं फोडून टाकली. दूध, भाजीपाला, पेपर सर्व पुरवठा तोडला. नळाचं पाणी तोडून टाकलं.

आणि पांचव्या दिवशी ते मजबूत गेट तुटलं. माओचा जयजयकार करीत ते पोरसवदा तरुण आत शिरले. बागेतलं झाडन् झाड उपटलं गेलं. दारांवर कुऱ्हाडींचे घाव बसू लागले. कानस वापरून खिडक्यांचे गज कापले जाऊ लागले. फादर जॉन प्रभूची प्रार्थना करीत होते. सिस्टर्स मेरीच्या पायाशी बसून प्रार्थना करीत होत्या. आयुष्यभर हे देह सुकवले. इच्छा मारल्या. भावना काबूत ठेवल्या. आणि आता हे सुकलेले देह लांडगे चघळणार आहेत.

तेवढ्यात तिथं पोलिस आले. त्यांनी सेंट मेरी चर्च ताब्यात घेतलं. सिस्टर्स आतल्या खोलीत एकमेकीना घट्ट धरून बसल्या होत्या. फादर जॉन शांतपणानं पोलिसांच्या प्रश्नांना उत्तरं देत होते आणि ती संधी साधून तरुणांच्या टोळक्यानं आत प्रवेश केला. त्यांच्यामागून उरलेले. फादर जॉनवर सारे तुटून पडले. प्रहारांमागून प्रहार होऊ लागले. दांत पडले. मार खाऊन गाल सुजले. ओठ फाटले. कपडे फाटले. फादर येशूची प्रार्थना करीत होते. "तू त्यांना क्षमा कर. प्रभो, तू त्यांना क्षमा कर."

तोपर्यंत बाकीचे तरुण सेंट मेरीच्या इमारतीतून फिरले. संहार करीत, नाश करीत फिरले. येशूच्या मूर्तीचे क्रुसासकट तुकडे झाले. मेरी छिन्नविच्छिन्न झाली. सेंट पीटर, सेंट जोसेफ छिन्नभिन्न झाले. धान्य लुटलं गेलं. कपडे नाहीसे झाले. पुस्तकांचे तुकडे झाले. उंच उचलून पियानो खाली आपटला. हातोडे मारून-मारून टाइपरायटरचे तुकडे झाले. मद्याच्या बाटल्या प्रथम रिकाम्या झाल्या आणि मग खळाखळा फुटल्या. दारं मोडून तोडून फकली गेली. खुर्च्या दाणदाण आपटून मोडल्या. केवळ पोलिस होते म्हणूनच सिस्टर्स वाचल्या.

आणि दुसऱ्या दिवशी पेकिंगहून आज्ञा आली. फादर जॉन आणि सिस्टर्स यांना हद्दपार करायचं होतं. त्यांना हाँगकाँगला हाकलून लावायचं होतं. तेथून त्यांनी कोठेही जावं. हा देश सोडून.

फादर जॉन फाटक्या कपड्यांनी ट्रकमध्ये बसले. प्रथम सिस्टर्स आणि मग फादर जॉन. सेंट मेरी चर्चकडे त्यांनी पाहिलं. या इमारतीत ते पन्नास वर्षं राहिले होते. त्यापूर्वीपासून ही इमारत इथं उभी आहे. अशी. थेट सव्वाशे वर्षं. आणि आज ते सारे निघाले होते. ट्रकभोवती ते तरुण जमले होते. गलिच्छ घोषणा देत उभे राहिले होते. काही नाचत होते, काही दगड भिरकावीत होते. फादर जॉन मूकपणे पाहात होते. काय चाललं आहे ते सिस्टर्सना कळतच नव्हतं.

आणि त्यांना जेव्हा कळलं तेव्हा हाँगकाँगमध्ये त्या ब्रिटिश वकिलातीत पोचल्या होत्या.

त्यांचे देह शिणले होते. उपासमार आणि जागरणांनी देह आंबले होते आणि मनं सुन्न झाली होती. त्या वकिलातीत पोचल्या आणि फादर जॉननी अंथरुण धरलं. बघता बघता फादर जॉनचा देह उन्मळून पडला. आत्मा उडून गेला.

सिस्टर फ्लॉरा, सिस्टर नॅन्सी त्यांची सेवा करीत होत्या. सिस्टर पॅट्रीसिआ तर मूकच झाली होती. प्रयत्न करूनहि तिला बोलताच येत नव्हते.

फादर जॉनचे अखेरचे क्षण फ्लॉराला दिसत होते. फादर जॉननी खूण करुन त्यांना जवळ बोलावलं आणि अगदी हलक्या आवाजात म्हटलं,

"त्यांना सांगा, तुम्ही आमचे देह जिंकलेत. देहाची विटंबना केलीत. पण आमची मनं खंबीर होती. अभंग होती."

क्षणभर थांबून फादर जॉन पुढे म्हणाले,

"त्यांना सांगा, आमचा प्रभू तुम्हाला क्षमाच करील, क्षमाच करील."

फादर जॉनचे डोळे लुकलुकले. हात धडपडू लागले. सिस्टर फ्लॉरानं फादर जॉनच्या गळ्यातील चांदीचा क्रूस त्यांच्या हातात दिला. फादर जॉननी तो क्रूस कुरवाळला आणि क्षणात त्यांचा आत्मा त्यांचा जीर्ण देह सोडून उडून गेला.

●●●

## कविता आणि कवी मित्रांसाठी

**'दीपावली'कडे अनाहूतपणे कविता पाठविणाऱ्या कवींचे काव्य प्रसिद्ध झाल्यास ते काव्य प्रसिद्ध झालेला फक्त अंकच यापुढे सदिच्छेचे प्रतीक म्हणून पाठविण्यात येईल. त्याबाबत कोणताही वेगळा पत्रव्यवहार करता येणार नाही याबद्दल क्षमस्व.**

**—संपादक**

# ऋशाचे दोन डोळे

शंकर इनामदार



—फुललं होतं मन सकाळपासूनच. तृप्त झालं होतं अभिमानानं. समाधान पावत होतं त्या खुषीच्या बेहोषीत. सुरवंटाचं फुलपाखरू बनवण्याची किमया होती त्या पत्रात. शब्दा शब्दात होता साक्षात्कार. आसक्तीचा. प्रीतीचा. मुग्ध भक्तीचा. जिव्हाळ्याचा. आपुलकीचा.

सांगितली होती तिनं तिची निवड. आईजवळ. हळूच. एकांतात. बोलण्याच्या ओघात. अगदी थोडक्यात.

"कसा आहे दिसायला ?" आईनं विचारलं होतं.

"चलतेस का बघायला ?"

"नको. बरं दिसत नाही तसं. तुला आवडला ना ?"

"इश्य ! तुला पण आवडेल. अन् पपांनापण."

"फोटो घे मागवून. मुकाट्यानं दाखवायला त्यांना."

संध्या. वेडी मुलगी. प्रेमवेडी.

भारीच अधीर. फारच उतावळी.

एवढी कशाला करायची घाई ?

एवढं कसं समजत नाही ?

आई तरी अशी कशी ? एकदम कशी पडली फशी ?

संध्या !

जितकी सुंदर तितकीच बिलंदर. जितकी गोड तितकीच लबाड.

बोलली असेल लाडं लाडं. घातलं असेल आईला कोडं.

फोटो ताबडतोब मागवला आहे. पत्र तांतडीचंच आलं आहे.

—संध्याकाळपासून शोधतो आहे. एकेक कप्पा हुडकतो आहे. नवा काढून पाठवीन म्हटलं तर वेळ तरी कुठं उरला आहे ? गेल्या वर्षीच काढला होता फोटो. एम्. ए. ला पहिला आलो तेव्हा. युनिव्हर्सिटीच्या समोर. त्या महागड्या पारशाच्या स्टुडिओत. एकदम क्लास. जपून ठेवलीय एक कॉपी. मलाच खूप आवडली होती म्हणून. ब्लॉक त्याचाच बनवला होता. टाईम्समध्ये तोच आला होता

अनुक्रमणिका

**ती मोत्यांची शिंपली ठाऊक आहेत ना तुला? आधी उघडी असतात. स्वाती नक्षत्राचा पाऊस पडला की बंद होतात. कालांतराने फोडली की त्यात मोती आढळतात.....**

छापून. सारे चकित झाले होते ती पोझ बघून.

मैत्रिण म्हणाली होती कालिंदीची "कोणगं हा? इतका वेस्ट."

"अगं हाच तो आमचा पेईंग गेस्ट," सांगितलं होतं कालिंदीनं मोठ्या तोऱ्यात. उसन्या नखऱ्यात.

भारावली होती ती चाळ माझ्या यशानं.

कालिंदीची ताई. आमच्या मालकीण-बाई. नाचत होत्या नुसत्या आनंदानं. फार प्रेमळ. फारच दिलदार. अतिशय उदार.

दोन महिन्याच्या रजेवर गांवी गेली. घराच्या किल्ल्या मला देऊन गेली.

"कपाटाच्या कशाला दिल्यात?" मी म्हटलं.

"असू देत. काय होतंय? काही लागलं सवरलं तर खुशाल घ्या. परके का तुम्ही?"

ताई गेल्या. कालिंदी पण त्यांच्यावरोबर गेली. आमची स्वारी एकटीच घरी. असाच पडलो होतो रात्रीचा. कॉटवर. पुस्तक वाचीत. सिग्रेटी जाळीत. दारावरचं बटण कॉलबेलचं. लागलं वाजायला एक-सारखं. धडपडत उठलो अन् उघडलं दार.

एक गृहस्थ. एक तरुणी—

"कोण हंवय?"

"ताई. म्हणजे आमची यमुताई–" गोंधळलेला गृहस्थ.

"गांवाला गेल्या आहेत त्या."

"कुठं?"

"सांगलीला?"

"कालिंदीपण?" रेडियमसारखे चम-कले दांत तिचे.

"होय. दोघीही गेल्या त्या."

"आम्ही आलो आहोत पुण्याहून. ताई माझी मेहुणी. ही उषा. कालिंदीची मावस वहीण."

"होय का? या ना आत."

"आपण—"

"तसा काही संबंध नाही. पण इथंच असतो मी."

"पूर्वी कधी बघितलं नव्हतं," त्यांनी विचारलं. कोचावर बसत. खोकत खोकत.

"नाहीच कधी. दीडच वर्ष झालं मला इथं येऊन."

"आपलं नांव?"

"राजाराम भावे."

"उषा बैस ना तिथं. उभी कां? काय सांगितलंत? भावे?"

"होय. राजाराम भावे."

"व्यवसाय—" खोकल्यात विरले पुढचे शब्द. श्वासात. छातीवर दाबलेल्या हाताखाली.

"प्रोफेसर आहे मी कॉलेजात."

"राहाणारे कुठचे?"

"आम्ही खरे वाईचे. पण वास्तव्य झालं इंदुरात. वडील आहेत डॉक्टर. सरकारी हॉस्पिटलमध्ये."

"शिक्षण सारं तिथंच झालं?"

"शाळेचं तिथं. कॉलेजचं इथं. रेसिडेन्सीत राहात होतो. नंतर कंटाळलो. मग आलो इथं. गेल्याच वर्षी एम्. ए. झालो. पहिला आलो."

"अरे वा!"

"तुम्ही चहा घेणार ना?"

"घेऊ थोडा. पण तुम्ही नका त्रास घेऊ. आमची उषा करील. उषा, ऊठ बाळ. असं बसून नाही चालायचं. घर आपलंच आहे. अग हे आहेत पाहुणे. जा. चहा कर."

उषा उठली. आत गेली. गालातल्या गालात हंसत. काहीसं लाजत.

"दाखवून येतो त्यांना. चहा साखरेचे डबे. दूध."

मी आत गेलो. ती भलतीच लाजली. गालांवर गुलाबाची बाग फुलली. गाला-वरची खळी थरथरली. बुबळं निळी लुकलुकली. कपाळाचं तोरण. बटांचे रेशमी गोफ. भिवयांची रेखीव महिरप. नासिकेची कळी. ओठांची पोवळी. नाजुक गळा. शुभ्रमोत्यांची माळा. तट्ट उरोज. पुष्ट शरीर. मोतियाचा रंग. केतकीचा ढंग. मुसमुसलेलं तारुण्य. आसुसलेलं लावण्य. नेत्रांची शांती. निरांजनीची ज्योती. वर बहर. आत काहूर.

दाखवायला आलो. आणि एकटक पाहात राहिलो.

बोटांनीच दाखवले डबे. आणि पातेलं दुधाचं. किती वेळ तिथं तसंच निरखीत राहायचं?

"उषाला म्हटलं होतं. मावशीला पत्र लिही. पण तीच म्हणाली–जरूर नाही."

"काम होतं ताईकडं?"

"तिच्याकडं नव्हतं काम. तसं काही अडायचं नाही. उद्या जायचंय हॉस्पिटलात."

"बरी नाही का तब्येत."

'खोकला येतो. श्वास दाटतो. छाती जड झाल्यासारखी वाटते. एकसारखी दुखत राहाते. पुण्याच्या डॉक्टरला शंका वाटते... कॅन्सरची."

"तपासून घेतलेलं बरं."

"ताई असती तर अडचण पडली नसती. ती आली असती बरोबर. दाख-वायला. आणि मलाही वाटला असता धीर."

"धीर नका सोडू. काळजी नका करू. मी येईन बरोबर तुमच्या. एक डॉक्टरीण-बाई आहेत तिथं माझ्या ओळखीच्या. होईल सारी व्यवस्था."

"होय ना? फारच उत्तम. आता नाही काळजी."

चहाचे प्याले. ट्रेमधून आले. नाजुक हातांनी उषानंच दिले.

करांगुलीचा ओझरता स्पर्श. कंपित करणारा. हृदयाची तार छेडणारा.

—रात्र चाळवीत राहिली मनाला. वाहेर मी एक. आत ती दोघं वापलेक. वाहेर लाटांची खळवळ. आत खोकल्याची उवळ. आत कंकणांची किणकिण. वाहेर व्यथेची झिणझिण. रात्रीचा प्रहर जाता जाईना. डोळयावर झोप येता येईना. असं कां होतंय तेच समजेना. मन करीत होतं तुलना. संध्येची अन् उषेची. उषा उत्साही. संध्या प्रोत्साही. उषा तेजस्वीनी. संध्या तपस्विनी. उषा चेतना. संध्या प्रेरणा. उषा संकल्पकारिणी. संध्या विकल्पहारणी. दोघीही सुंदर. दोघीही चित्तमनोहर. सशाचे दोन डोळे. गुंजेसारखे लाल. कोणता त्यातला चांगला ? कोणता वाईट? पण एक आहे डावा. दुसरा उजवा. सुंदरतेतही असतंच डावं उजवं. मग कोण डावी अन् कोण उजवी ? संध्या डावी ? काय म्हणून ? ती कां नाही उजवी ? दोघीही सारख्याच. मला तहान लागली आहे. व्याकुळ झालो आहे मी. मला पाणी हवं आहे. कुठल्याही भांड्यातून चालेल. भांडं स्वच्छ हवं. आतलं पाणी थंडगार हवं. जे आधी मिळेल ते प्यायचं. जे जवळ असेल ते घ्यायचं.

पुरुषाचं मन चंचल असतं. फुलपाखरासारखं. कुठंही जातं. कुठंही वसतं. कुठंही रमतं. वृत्ती मुळात अधिरी नसते. पण आकर्षणाची प्रखरता धीराला वितळवून टाकते. आकर्षण पुढं असलं म्हणजे धीर धरवत नाही. ताबा राहात नाही मनावर. मनाचा विंचू नांगी टाकतो. मी मी म्हणणारे हरले. विश्वामित्र बनले. आकर्षण पुढं नसेल तर आठवणही होत नाही त्याची. प्रीती जमली होती माझी अन् संध्याची. वचनं दिली होती एकमेकांना लग्नाची. एकनिष्ठतेची.

"राजा, मला सोडून जाणार नाहीस ना कुठं ?" विळखा घालून विचारलं होतं तिनं. "संध्या, राजाच्या जोडीला मी रामही आहे. राम कसा होता. एकवचनी. एकवाणी. एकपत्नी. या राजारामानं तुझी निवड केली आहे. पत्नी होणार आहेस तूं माझी. पण तू मात्र नकोस सांपडूस तडाख्यात. एखाद्या रावणाच्या."

"असं रे काय वोलतोस ? ती मोत्याची शिंपली ठाऊक आहेत तुला ? आधी उघडी असतात. स्वाती नक्षत्राच्या पाण्याचा थेंब पडला की वंद होतात ती. मग फोडल्याशिवाय उघडत नाहीत. फोडल्यावर दिसतं काय आत ठाऊक आहे? पाण्याच्या त्या थेंबांची मोत्ये बनलेली असतात. मी शिंपली. तू स्वाती."

"म्हणजे नक्षत्र ना ?"

"जा वाई, तू थट्टा करतोस. आम्ही नाही वोलत."

ती आठवण झाली अन् वाटलं कसायात अन् आपल्यात काय फरक ?

वोकडा मेंढरांना तो खूप खायला घालतो. त्यांचे लाड करतो. अन् एक दिवस त्याच हातानं सूरी फिरवतो मानेवर त्यांच्या.

संध्येला फसवू मी ?

मानेवर सुरी फिरवू तिच्या ?

वचन दिलं होतं ना तिला ?

वचन !

★ ★ ★

—हॉस्पिटलात तिघंहि गेलो. डॉक्टरांनी तपासलं. दोन दिवस तिथं त्यांच्या देखरेखीखाली राहावं लागेल म्हणाले. तासीतासानं तपासावं लागेल. व शरिराच्या होणाऱ्या हालचालीवर लक्ष ठेवावं लागेल. दोन दिवसांनंतर सांगता येईल नक्की. सध्याच्या स्थितीत काहीच सांगता येणार नाही खात्रीपूर्वक. डॉक्टरीणबाईजवळ चौकशी केली. दुसऱ्या कुणाला ठेवून घेता येणार नाही म्हणाल्या पेशंटबरोबर. निरोप घेऊन निघालो.

"तुम्हाला त्रास–निष्कारण" डोळयात पाणी आणून वोलले.

"त्रास कसला ? तुम्ही काळजी नका करू. अजून निश्चित कुठं सांगितलय डॉक्टरांनी ?"

"उषाला सांभाळा. तुम्ही माझ्या मुलासारखे."

"तुम्ही निश्चित असा. कसलीच फिकीर नका करू."

—त्यादिवशी दोघंच आम्ही त्या घरात. वापाच्या काळजीत पडलेली लेक. घावरलेली. वावरलेली. पिंजऱ्यातल्या प्राण्यासारखी भेदरलेली. विद्ध झालेली. सुखानंतर दुःख परवडतं. पण दुःखा पाठोपाठ येणाऱ्या सुखाचं स्वागत नाही करता येत. जवाहरलालजी गेले. नंतर एस्. एस. सी. चा निकाल लागला. पास झालेल्या विद्यार्थ्यांनी पेढे वाटले नाहीत तेव्हा. पास झालेल्यांची तोंडं सुद्धा उतरलेलीच राहिली. असा हा दुःखानंतरचा आनंद. जीव टांगणीला लागला होता उषाचा. दोन दिवसानंतर काय ऐकायला मिळणार आहे ही काळजी. एकसारखी खुपत राहाणारी. संदेहात ठेवणारी. स्वास्थ्य नष्ट करणारी.

–आवश्यक तेच वोललो. वाजवी शब्दात धीर दिला. मी बाहेर एकटा. ती एकटी आत. डोळयावर झोंप येत नव्हती. पण ती व्यथा वेगळी होती. रात्र मनाला चाळवीत नव्हती. आत कंकणांची किणकिण होती तरी बाहेर कसलीच झिणझिण नव्हती. उषा उत्साही वाटली नाही. तेजस्विनी भासली नाही. चेतना. संकल्पकारिणी. सुंदर. चित्तमनोहर. डावी अगर उजवी अगदी काही सुद्धा मनात आलं नाही. जणू मी विश्वामित्राहून श्रेष्ठ होतो. जणू मी पुरुषच नव्हतो. वृत्तीची भावना जशी काही नव्हतीच माझ्यात. आकर्षण जणू नव्हतंच कुठलं. दोन्ही दिवस शांतपणे पार पडले.

—आणि दुःखामागून सुख आलं. डॉक्टरांनी रिपोर्ट दिला. पेशन्टला कॅन्सर नाही. उषा फुलली. भलतीच लाजली. गालावर

गुलाबांची बाग बहरली. गालावरची खळी थरथरली. बुबुळं निळी लुकलुकली. कपाळाचं तोरण. वटांचे रेशमी गोफ. भिवयांची रेखीव महिरप. नासिकेची कळी. ओठांची पोवळी. नाजुक गळा. शुभ्र मोत्यांची माळा. तट्ट उरोज. पुष्ट शरीर. मोतियाचा रंग. केतकीचा ढंग. मुसमुसलेलं तारुण्य. आंसुलेलं लावण्य. दृश्य तेच. पण दृष्टिकोन वेगळा. डॉक्टरांनी औषधांची एक यादी करून दिली होती. ती वेळच्या वेळी घेतली तर धोका नाही असं सांगितलं होतं.

"आणलीत का औषधं ?" कॉलेजातून आल्यावर मी विचारलं.

"पुण्यात गेल्यावरच घेऊ."

"त्यातलं एखादं मिळायचं नाही एखादवेळी पुण्यात. इथंच सारी घेतलेली बरी" मी म्हटलं.

"विचार होता घ्यायचा. पण—"

"पैसे कमी पडतात का ?"

"पैसे पुरेसे नाहीत म्हणूनच."

"किती लागतील ? नाही तर असं करा. द्या ती यादी माझ्याजवळ. मी देतो आणून."

"कशाला तुम्हाला त्रास ?"

"पुन्हा असं म्हणालात तर राग येईल मला."

त्यांनी यादी दिली. मी औषधं आणून दिली.

"किती झालं बील ?"

"हे घ्या."

"एकशे चौदा रुपये ? भलतीच महाग."

"महाग असली तरी घ्यायला हवीत. पैशांकडं पाहून चालायचं नाही."

"पुण्याला गेल्यावर पाठवून देईन पैसे."

"पाठवा सावकाश. घाई नाही माझी."

"तुम्ही देवमाणूस आहात. माझा आशीर्वाद आहे. काही कमी पडायचं नाही तुम्हांला."

—संध्येला पाठवण्यासाठी फोटो नवाच काढायला हवा होता. गेल्या वर्षी काढून घेतलेल्या त्या क्लास फोटोची कॉपी सांपडलीच नाही कुठं. शोध शोध शोधली. एकेक कप्पा हुडकला. जरा चांगले कपडे चढवले. केसांची ठेवण बदलली. संध्येला आवडते तशी. नव्या फोटोसाठी. दारावरचं बटण. कॉलबेलचं लागलं वाजायला एकसारखं.

दार उघडलं.

पोस्टमन.

"रजिस्टर आहे आपलं साहेब."

"माझं ?"

"होय. प्रोफेसर राजाराम भावे."

"आणा इकडं."

घेतलं ते रजिस्टर सही करून. उषाचं पत्र. पुण्याहून आलेलं. सोबत चेक. अन् फोटो. माझा फोटो. हाच मी शोधीत होतो.

'नम्रतापूर्वक नमस्कार,

रागावला असाल इतके दिवस पत्र पाठवलं नाही म्हणून. खरं सांगू का ? नुसतं पत्र पाठवायचं आणि औषधाचं बील ? मनाला प्रशस्त वाटलं नाही. विलंब लागला पैशांची सोय व्हायला. दिरंगाईबद्दल दिलगीर आहे. सोबत एकशे चौदाचा चेक आहे. मिळाल्याचं कळवावं. ती औषधं घ्यायला लागल्यापासून बाबांच्या तब्येतीला पुष्कळच आराम पडला आहे. तुम्ही वरीच तसदी घेतली ! आभार कोणत्या शब्दात मानावेत ?

एका गोष्टीबद्दल क्षमा मागायचीय तुमची. तिथल्याच एका पुस्तकाच्या प्रोटी तुमचा एक फोटो हाती लागला होता. अशा सत्पुरुषाची आठवण सदैव जवळ असावी म्हणून दडवला मी तो. तुम्ही म्हणाल – किती वेडी ही मुलगी ! खरंच वेडी आहे मी. तुम्ही धीर दिलात. मदत केलीत. तुम्ही मला प्रत्यक्ष परमेश्वर भासलात. वाटलं होतं एकदा. विचारावं तुम्हाला फोटो घेऊ का म्हणून. पण—लाज वाटली.

परवा कशासाठी तरी बाबांनी माझी बॅग उघडली. त्यांना दिसला तो फोटो.

'कशाला गं हा ? कुणी दिला ? राजाभाऊंनी स्वतः ?'

—होय कशी म्हणू ? मी खोटं बोलले असते तर गैरसमज नसता का झाला बाबांचा तुमच्याबद्दल ? मी खरं तेच सांगितलं. त्यांना ते आवडलं नाही. फोटो तुम्हाला परत पाठवून द्यायला बजावलंय त्यांनी. फोटो मिळाला असं तुमच्या उत्तरात कळवायला विसरू नका.

एक वेडी—उषा.'

● ● ●














**नाटयसूत्र :—दिग्विजय आटोपून परत आल्यानंतर कीचकाने विवाह करावा असा हट्ट त्याची बहीण सुदेष्णा धरते. तो सांगतो पांचाळीशीच लग्न करावयाची इच्छा होती.. आता अन्य कोणाशी विवाह अशक्य, केवळ अशक्य... याच वेळी पांच पांडव व द्रौपदी अज्ञातवासाचे वर्ष घालविण्यासाठी त्याच्या राज्यात आलेले असतात. सुदेष्णेने त्याना आश्रय दिलेला असतो. सैरंध्रीचे रूपाने वावरणारी द्रौपदी पाहून कीचक संभ्रमित होतो. त्यास पुढे बृहन्नल व बल्लव आणि इतर तिघे भाऊ तेथे दाखल होतात. आणि नाट्य रंगू लागते....**

[राजगृहातील पाकशाळेतून कीचकाच्या मंदिराकडे जाण्याचा मार्ग. कीचक आणि सुदेष्णा एकमेकाशी बोलत उभे असून काही अंतरावर काही दासी उभ्या आहेत, त्यात सैरंध्रीहि आहे.]

**सुदेष्णा** – दादा, जेवणाचा बेत कसा काय वाटला? आवडला ना स्वयंपाक? आपल्या पाकशाळेतला स्वयंपाक तुला फारसा आवडत नाही हे मला ठाऊके आहे, म्हणून मुद्दाम विचारते आहे. नेहमी पहावं तर स्वारीहून परत आल्यावर पहिल्या भोजनाच्या वेळी स्वारीवर असताना ताव मारलेल्या विविध पक्वान्नांचे रसभरीत वर्णन करीत असतोस.. पण खरं सांगू का ते ऐकून मला नेहमीच वाईट वाटतं आणि पुन्हा तू स्वारीहून परत येशील तेव्हा तुझ्यासाठी उत्तमोत्तम पदार्थ तयार करून तुला प्रसन्न ठेवण्यासाठी मी नव्या नव्या माणसांची पाकशाळेत नेमणूक करीत असे. घरच्या अन्नाची तुला एकदा गोडी लागली की तू नेहमी स्वारीच्या निमित्ताने राजनगरीबाहेर जाऊ नये, हा माझा हेतु...पणं माझा आपला अजूनहि असाच समज आहे की तुला घरच्या जेवणापेक्षा बाहेरचंच जेवण अधिक आवडतं. तुझ्यासाठी कितीहि चांगले पदार्थ केले तरी तुला आपली बाहेर खाल्लेल्या पदार्थांची आठवण व्हायचीच... पण आज मात्र जेवताना तू बाहेरच्या पदार्थांविषयी एक शब्दहि काढला नाहीस. . मला खरोखरच मोठं आश्चर्य वाटलं नि म्हणूनच मी तुला विचारते. . आजचा बेत तुला आवडला का? आज सिद्ध केलेल्या पदार्थांत काही फरक वाटला का?

**कीचक** — ताई, आजचा बेत फारच छान होता. मला सारेच पदार्थ फार आवडले. मी जे काही खात होतो त्याकडेच माझं सारं लक्ष केंद्रित व्हावं, दुसरी कसलीहि आठवण होऊ नये म्हणून तू घेतलेली दक्षताहि वाखाणण्याजोगी होती. तुझ्या या प्रेमळपणानं मी अगदी भारावला गेलो आहे.. मला वाटतं गेल्या पांच पंचवीस वर्षांत तरी इतकं रुचकर जेवण आपल्या पाकशाळेत झालं नसावं. . आणि म्हणूनच ताटातल्या प्रत्येक पदार्थांवर मी अगदी यथेच्छ ताव मारला. . इतकं चांगलं जेवण जर इथच मिळत असेल तर बाहेर जाण्याची इच्छाच कशाला होईल. . वर्षभर आपलं इथच रहावं. . माझं मन प्रसन्न ठेवण्यासाठी यावेळी तू खूपच कष्ट घेत आहेस.

**सुदेष्णा**— तुझं बोलणं ऐकून मनाला समाधान वाटलं. गेल्या पंचवीस वर्षांत जे साधलं नाही ते आज, एकदा तरी साधलं म्हणून किती आनंद झाला म्हणून सांगू? तू लग्न करून सुखानं इथंच रहावं असं मी तुला नेहमीच म्हणत असते. तूं इथंच राह्यलास म्हणजे मुलांच्याहि शिक्षणाची चिंता उरणार नाही. तू घरीच रहावा म्हणून मी माझ्या रीतीनं कितीतरी प्रयत्न करते, तुझ्या आर्जवा करते. . पण पुन्हा तू स्वारीवर जातोसच. नृत्यविद्येत मुलांची होणारी मंदगति, उत्तमोत्तम पदार्थांना तू ठेवलेली नांवं आणि त्यांचा केलेला त्याग पाहून म्हणजे माझ्या मनाची विलक्षण कुचंबणा होई. मी तुझ्यासाठी खूप धडपडत असते पण माझ्या झिजण्याला यश येतच नसे. माझ्या मनाची कितीहि चुळबुळ झाली तरी शेवटी तुला घरी ठेवून घेण्याचा नाद मला सोडून देणं भागच पडे. . आणि तूहि स्वारीवर जात असस. . यावेळी मात्र स्वारीवरून येणाऱ्या तुझं स्वागत करताना मला आनंद होत आहे. नव्या नाटचाचार्यांनी मुलांची नृत्यशिक्षणात केलेली प्रगति आणि नव्या सूपकारांनी सिद्ध केलेले पदार्थ—पाहून, खाऊन तू संतुष्ट झालास. तुझे नेत्र, जिव्हा आणि मन प्रसन्न झालेलं दिसतं... आता तरी नेहमी इथंच राहशील ना! मुलांकडे पाहून तरी तुला राह्यलाच हवं. . यावेळी तर मी असं ठरवलं आहे की खास तुझ्यासाठी नियुक्त केलेली सगळी माणसं तुझ्या समोर उभी करून तुझा बाहेर जाण्याचा मार्गच रोखायचा. युवराज जर राजधानीत सुखासमाधानाने राहू लागले तर इथली सारी प्रजा आनंदानं नाचू लागेल.

**कीचक**—माझ्याविषयीचं तुझं हे नि:सीम प्रेम पाह्यलं म्हणजे ताई, माझं मनं कसं भरून येतं.. इथंच राहून मुलांच्या प्रगतीसाठी झटावं असं जे तू म्हणतेस ते ठीकच आहे. . पण खरं सांगू तूंच





अनुक्रमणिका

मुलांना इतकं व्यवस्थित ठेवलं आहेस की त्यांच्यासाठी मी इथं राहण्याची काही आवश्यकता आहे असं वाटत नाही..उत्तरे-कडेच पहाना..गेल्या वर्षी ती एक साधी परकरी पोर होती.. पण काल जेव्हा मी तिला पाह्यली तेव्हा अस्फुट कलिकेचं पूर्ण विकसित पुष्पात रुपांतर व्हावं, असं तिचं रसरसलेलं तारुण्य दिसलं..केवळ उण्यापुऱ्या एका वर्षात घडून आलेला हा बदल पाहून मला मोठं आश्चर्य वाटलं.. गेल्या वर्षीची ती कृशांगी उत्तरा आणि आज दिसणारी ही तारुण्यानं मुसमुसलेली उत्तरा.. उत्तरा देखील तारुण्यानं फुलत आहे.. आज ज्या प्रकारचं अन्न मी खाल्लं, तसंच जर रोज त्यांना मिळत असलं तर त्यांची अशी वाढ कां होणार नाही? आपलीच मुलं का पण कालपरवा-पर्यंत पोरसवदा वाटणारी इतर मुलं सुद्धा आज सौंदर्य, सौष्ठव यांनी तेज:पुंज आणि यौवनसंपन्न झालेली पाहून माझं मन मोठं प्रसन्न झालं.. जुन्या नृत्यशाळेतून नवा उत्साह यावेळी ओसंडून बाहेर पडताना दिसत आहे..काल नृत्य पाह्यलं तेव्हाच माझी खात्री पटली की नृत्यशाळेत सध्या काही तरी नवं आणि चांगलं शिकवलं जात आहे...सारं वर्षभर आपली नृत्यशाळा ही अशीच रहावी असं मला सारखं वाटत आहे.. ताई, खरं सांगू का, कालपर्यंत मात्र मला असं कधीच वाटत नव्हतं..माझ्यासाठी काल जे प्रदर्शन नृत्यालयात योजलं होतं ते पाहून मला किती आनंद झाला आणि समाधान वाटलं म्हणून सांगू?

**सुदेष्णा** :—दादा, ते प्रदर्शन नव्हतं, रोज नृत्यालयात काय चालतं त्याचं ते प्रत्यक्ष दर्शन होतं.. अल्पावधीतच शिष्यांना नृत्याचे किती विविध प्रकार नव्या नाटचाचार्यांनी शिकवले आहेत हे जुन्या नाटचाचार्यांनां कळलंच असेल. मुलांनी सुद्धा किती झट-कन् सारं आत्मसात् केलं आहे नाही? कालचं प्रात्यक्षिक हा नृत्य-शाळेतील दैनंदिन कार्यक्रम आहे.

**कीचक** :—ताई, तू म्हणतेस ते खरं आहे. मुलांनी अल्पा-वधीत केलेली प्रगति चटकन् डोळचात भरण्यासारखी आहे. नृत्यातले किती तरी नवे नवे प्रकार ते शिकले आहेत..या गोष्टीकरिता तरी आपण नव्या नाटचाचार्यांचे सदैव ऋणी राहिले पाहिजे. मुलांची होणारी ही प्रसन्न वाढ आणि शैक्षणिक प्रगति पाहून मनाला विलक्षण आनंद होतो. या नव्या नाटचाचार्यांमुळे मला इथं राहण्याचा मोह व्हावा अशी जर तुझी योजना असेल तर तुझं कौतुकच करायला हवं....मुलांच्या प्रगतीचं निरीक्षण करीत उरलेलं आयुष्य इथंच काढावं असं मलाही वाटू लागलं आहे. एवढी प्रगति आणि इतक्या अल्पावकाशात?

**सुदेष्णा** :—दादा! मुलांच्या शारीरिक वाढीचे श्रेय मात्र नाटचा-चार्यांना देता येणार नाही. त्याचं खरं कारण म्हणजे इथं आलेली नि तीहि आपणहून आलेली आणखी एक व्यक्ति आहे..नाटचाचार्यां-प्रमाणं तीहि नवीनच आहे...अशी एकादी व्यक्ति आपल्याकडे असावी म्हणून मी आज किती तरी दिवस खटपट करीत होते.. परंतु मला ती मिळालीच नाही..जिच्यामुळं.....

**कीचक** :— आणखी एक नवी व्यक्ति! आणि जिच्यामुळं ह्या मुलांची शारीरिक वाढ झाली म्हणतेस? नाटचाचार्यांप्रमाणं हेहि आणखी एक कुतूहल आहे. ही जी व्यक्ति आहे—ती मल्ल आहे का वैद्य?

**सुदेष्णा** :—तसं पाह्यलं तर ती व्यक्ति मल्लहि नाही नि वैद्यहि नाही. पण देहयष्टीवरून मल्ल म्हणायला आणि हाताचा गुण पाह्यला तर वैद्य म्हणायला हरकत नाही. खरं सांगायचं म्हणजे ही व्यक्ति म्हणजे आमच्या पाकशाळेला लाभलेला एक नवा सूपकार—आचारी आहे. त्यानं शिजवलेल्या अन्नानंच मुलं हृष्टपुष्ट झाली आहेत नि नाटचाचार्यांनी शिकवलं म्हणून ज्ञानी होत आहेत.

**कीचक** :—म्हणजे मी त्याला पाह्यलं आहे तर? ताई, तूं मला एकामागून एक आश्चर्याचे धक्केच देते आहेस. कुठं आहेत हे सूपकार. त्यांना मला भेटू दे. त्यांची पाठ थोपटू दे...

**सुदेष्णा** :—तूं त्यांना पाह्यलं आहेसच, इतकंच नव्हे तर त्यांनी तुला इतके रुचकर पदार्थ करून खायला घातले आहेत की त्या चविष्ट पदार्थांच्या सेवनाच्या आनंदात त्याच्या कर्त्याचा तुला विसर पडला असं वाटतं...तूं जेवत असताना माझं सारखं तुझ्याकडं लक्ष होतं...गेल्या कित्येक वर्षांत इतकं मन लावून तूं जेवल्याचं मला काही आठवत नाही..आज मुख्य म्हणजे जेवताना तूं एकाहि पदार्थाला नांवं ठेवली नाहीस.. नि त्यामुळं मला निदान एकदा तरी मोठं समाधान लाभलं.. हे मी सांगायला का हवं?

**कीचक** :—आत्ता मी जे खाल्लं ते सारं त्यानं केलं होतं? ताई, कितीतरी दिवसांनी असं अन्न पाह्यला मिळालं मला.. असं अन्न मिळावं ही माझी फार दिवसांची इच्छा होती..




स्वैर अनुवाद—प्रा. श्री. र. भिडे | ३






परंतु ते मला मिळत मात्र नव्हतं.. आजच्या सारखं खायला मिळालं म्हणजे मनाला किती बरं वाटतं म्हणून सांगू..असं अन्न सहज अंगी लागतं... देहाला पुष्ट आणि मनाला तुष्ट करणारे असले अन्नपदार्थ वाढून ताई, तूं माझ्यावर फार मोठे उपकार केले आहेस. - हे ऋण कसं फेडायचं हाच माझ्यापुढं प्रश्न आहे. . .

**सुदेष्णा** :—ऋण कसलं ?..नि असलंच तर ते माझं नसून त्या सूपकाराचं आहे.. ऋणाची फेडचं करायची असली ज्यानं जवळ जवळ वर्षभर रोज आम्हाला असले पदार्थ शिजवून घातले नि आज तुला संतुष्ट केलं—त्याचे पाहिजे तर आभार मान.. माझी निवड..

**कीचक** :—ताई, तूं शोधलेली ही नवी व्यक्ति एक सूपकार आहे. नाही ?

**सुदेष्णा** :—तो एक सूपकार नाही. दहा जणांचं बळ आहे त्याच्या जवळ, नि आपल्या कामात चांगलाच निपुण आहे. त्याच्या हातच्या गुणांमुळंच तूं प्रसन्न झाला आहेस ना ! तो राज-सूपकार असला तरी वास्तविक त्याला सूपकारांचा राजाच संबोधायला हवं. पाकशाळेतून तो पहा बाहेर येत आहे. तूं जर त्याच्यावर संतुष्ट झाला असशील, नि मला वाटतं तूं झालाच आहेस—तर तूं स्वतःच त्याच्याशी बोलून त्याचं अभिनंदन करावं !

**कीचक** :—अगदी आनंदानं ! नांव काय त्याचं ?

**सुदेष्णा** :—तो स्वतःला 'बल्लव' म्हणतो.

**कीचक** :—(न ऐकल्यासारखं करून) काय म्हणालीस 'नल'?

**सुदेष्णा** :—'नल' नाही...बल्लव.. ब—ल्ल—व !

**कीचक** :—मला पुन्हा 'नल' हीच अक्षरं ऐकू आल्यासारखी वाटली. रुचकर पक्वान्नं तयार करून देव—मानवांना संतुष्ट करणाऱ्या नलाचेच विचार माझ्या मनात घोळत असल्यानं कदाचित् त्याच्यासारखाच हा दुसरा 'नल' असेल असं वाटलं मला.. नवे नाटचाचार्य बृहन्नल आणि हा 'नल' असं नाही ना !.. निदान त्याचा भाऊबंद.. मी विचारणार होतोच तुला.. बरं पण असू दे.. हा तुझा 'नल' ...नव्हे ब—ल्ल—व का कोण तो इकडंच येत आहे ना !

(आचाऱ्याची पळी—झारे इत्यादि उपकरणी हातात घेऊन येणाऱ्या भव्याकृति बल्लवाला पाहून कीचक थबकतो. योग्य ते अंतर राखून बल्लव आदरानं उभा राहतो.)

**सुदेष्णा** :—बल्लवा, आज इतके दिवस रुचकर पदार्थ खायला घालून आम्हाला तर संतुष्ट केलंसच, परंतु तुझ्या पदार्थांची गोडी चाखून कीचक महाराजहि तुझ्यावर प्रसन्न झाले आहेत. ते तुझं जातीनं अभिनंदन करीत आहेत. [धन्य झाल्याचा आव आणून बल्लव वंदन करतो. त्याच्या देहाचे आपादमस्तक अवलोकन करून कीचक सुदेष्णेला उद्देशून]

**कीचक** : माझ्या शरीराप्रमाणं याचाहि देह राजबिंडा आहे. हातात जर आचाऱ्याची झारा-पळी नसती तर हा खचितच एखादा मल्ल किंवा गदायुद्ध खेळणारा वीर पुरुष म्हणून सहज शोभून दिसला असता. ह्याची ती पावलं टाकण्याची ढब मला परिचीत वाटते. . . पळीऐवजी ह्याच्या हाती गदाच अधिक शोभून दिसेल. परंतु नेहमीप्रमाणं मला वाटतं मी विषयांतर करतो आहे.. (बल्लवास उद्देशून) बल्लवा, आतापर्यंत माझी ही भगिनी, सुदेष्णा तुझ्याविषयी जे बोलली त्याला मी साक्षी आहे. तुझ्या वर्णनात बिलकूल सुद्धा अतिशयोक्ति आहे असे मला वाटत नाही. आमच्या मुलांना विविध प्रकारची पाकसिद्धी करून तू संतुष्ट केल्याबद्दल ही सांगत होती. मुलांची प्रकृति पाहून मलाही असंच वाटतं कीं तुझं अन्न त्यांना चांगलं मानवलं आहे. आमच्या राज्यातील स्त्रीपुरुषांची तूं जी ही सेवा करीत आहेस त्याबद्दल मी तुझे मनःपूर्वक आभार मानतो. (सुदेष्णेकडे पाहून तो हंसतो व तीहि त्याला प्रतिसाद देते.) नव्या नव्या व्यक्तींची निवड करून त्याना येथे नियुक्त करून मला राजधानीतच कायम ठेवून घेण्याची आमच्या बहिणीची खटपट मोठी कौतुकास्पद आहे यात शंकाच नाही. हिला सुखावण्याकरता बल्लवा, तूं कायम इथंच रहावं असं मला वाटतं. हिच्या प्रयत्नात ती बरीच यशस्वी झाली आहे हे मलाहि कबूल करणं भाग आहे. माझी सेवा करण्याकरिता कितीतरी नव्या तरुण स्त्रियांची तिनं निवड केली आहे... माझ्या-करिता सिद्ध केलेला हा तरुण स्त्रियांचा घोळका पाहिला... खास माझ्यासाठी म्हणून तूं ज्या एका सुंदर स्त्रीची नेमणूक केली आहेस...तिचं नांव काय म्हणालीस ?

**सुदेष्णा** : तिचं नांव सै-रं-ध्री ...मला वाटतं ती एखादी राजकन्या असावी...वेषांतर करून तिनं दास्यकर्म स्वीकारलं असावं...दुर्दैवानं बिचारीवर ही वेळ आली असावी...







अनुक्रमणिका

(वल्लवाचे शरीर रागाने लाल होते व त्याच्या डोळ्यातून अग्निस्फुल्लिंगच बाहेर पडत आहेत असा भास होतो..पण हे सारे क्षणमात्रच. तो स्वतःला लगेच सावरतो.)

**कीचक** : सैं-रं-ध्री ! मी तिचा पत्नी म्हणून स्वीकार करावा अशीहि तुझी इच्छा आहे नाही ? आणि तसं तू मला सुचवलंसहि (मोठ्याने हंसत) माझ्यासारख्या अप्रतिहत योद्धयाच्या मार्गात मोह उत्पन्न करण्याचा तुझा हा प्रयत्न... मी त्याला बळी पडणार ? आता या वयात मी वाईल करावी ? जन्मभर कधीच कोणाहि मानवाला यश मिळत नाही हे मला ठाऊक आहे. पण आता एखाद्या स्त्रीच्या मोहाला–मग ती प्रत्यक्ष सम्राज्ञी असो वा वेषांतरीत राजकन्या असो–बळी पडणे शक्य नाही हे तूं निश्चयपूर्वक जाण.. नृत्यकलेतील नैपुण्यानं एखाद्या स्त्रीचं मन जिकणं किंवा गदायुद्ध, वाहुयुद्ध अथवा कुस्ती यांच्या स्पर्धांत एखादी स्त्री जिंकणं मला सहज शक्य होतं... पण ते काही वर्षांपूर्वी...आज नाही, तुला संतुष्ट करायची म्हटलं तरीहि शक्य नाही...(वल्लवाकडे पाहून) तुझ्या हातचं अन्न खाऊन मात्र मला आता पूर्वीसारखी सुर-सुरी यायला लागली आहे. ताई, तुझ्या दासींच्या मोहाला बळी पडून स्वतःचा अधःपात करून घेण्यापेक्षा एखाद्या–याच्या सारख्या–मल्लाशी कुस्ती खेळून चित झालो तरी मला धन्य वाटेल. मी इथंच रहावं म्हणून मला योग्य असा एखादा मल्ल तू कां नाही शोधत ? मी त्याच्याशी कुस्ती खेळत सुखानं राहीन इथं...मला कसं चीत करायचं हेही शिकवीन त्याला... ताई, खरं सांगूं का मला आजपर्यंत सारखं यशच मिळत गेल्यानं, मला आता या यशाचा कंटाळा आला आहे... या वल्लवाची जर तूं माझ्याशी कुस्ती खेळण्यासाठी योजना केलीस...भीमासारखा याचा देह पाहून माझे बाहु स्फुरण पावू लागले आहेत. याचं, हे पीळदार शरीर पाहून कुस्ती खेळण्याची सुरसुरी कुणाला येणार नाही ? पण हातातल्या उपकरण्यामुळं हा मल्ल नसून आचारी आहे ही जाणीव उत्पन्न होते..राजघराण्याच्या प्रतिष्ठेला शोभणारा राज-सूप-कार ! बृहन्नलाप्रमाणं यालाहि कायम इथंच सुखानं राहता येईल अशी काळजी घे.

[बल्लवाकडे दृष्टिक्षेप टाकून त्याला जाण्याची सूचना देतो. अनिच्छेने वंदन करून बल्लव गेल्यासारखे करून दूर जाऊन उभा राहतो. वल्लव आणि सुदेष्णा आपापल्या मंदिराकडे जाऊ लागतात वाटेतील पुष्पवाटिका व कारंजे पाहून कीचक थांबतो] हीच ती जागा . . .हेच ते रम्य, पवित्र स्थळ. . .माझे मेव्हणे सम्राट विराट महाराज यांच्याबरोबर मोठ्या उत्साहानं आणि आनंदात तूं प्रणयक्रीडा प्रथम इथंच खेळलीस. .तुमच्या प्रणयलीला पाहून राजघराण्यातील इतर दंपतीनी तुमची केलेली थट्टा मस्करी मी माझ्या मंदिराच्या सज्जातून पहात असे. ताई, ही जागा फार पवित्र आहे..आपल्या घराण्यातील अनेक स्त्रीपुरुषांनी एकमेकावरील प्रीतीच्या आणाशपथा इथंच घेतल्या, प्रणयलीला इथंच खेळल्या नि एकमेकाचा विश्वास संपादन केला. .तुमच्या विवाहाचा राज सोहळा संपताच एके दिवशी चांदणी भोजनाचा समारंभ होता. .आठवतो ना ? आपल्याला ज्यांनं लहानंच मोठं केलं त्या आचाऱ्यानं किती सुरेख भोजनाचा बेत केला होता...त्यानं केलेल्या पक्वान्नावर असा हात मारला होता. . .किती छान दिवस होते ते. . .तो उत्साह. .ते तारुण्य. . (सुस्कारा सोडत) . .ते हि नो दिवसा गता. . .आणि नंतर काही दिवसातच तो म्हातारा –बिचारा वारला. . .आणि तेव्हापासून आपल्या पाकशाळेवर जणु काय प्रेतकळाच पसरल्यासारखी वाटते. . . .हा नवा आचारी मात्र पूर्वीच्या आपल्या म्हाताऱ्याची आठवण करून देतो अं. .ह्याच्या हातचं अन्न खाताच माझ्या पूर्वीच्या आठवणी चाळवल्या गेल्या. . आणि ही पुष्पवाटिका, हे कारंज. .हेही आच पूर्वीसारखंच पुन्हा प्रफुल्लीत दिसतं आहे. या स्थळाचा ताजेपणा तूं प्रयत्नपूर्वक टिकवला आहेस. . .अगदी थेट पूर्वीचाच थाट. . . .

**सुदेष्णा** : दादा ! पुनः पुन्हा सांगते. म्हणून रागावू नकोस . .या वयातही विवाह करून वहिनीला घेऊन इथं यावं, तूं आणि तिनं इथं प्रीतीच्या आणाभाका घ्याव्या.. .प्रणयाचे खेळ खेळावे. .त्यामुळं या स्थळाचं पावित्र्य आणि महात्म्य आणखी वाढेल. . .या ताजे-पणाला एक नवा साडा लाभेल. .तुझ्या सेवेसाठी मी ज्या स्त्रिया धाडते, त्या माझ्या योजनेतील खरा हेतु तूं जाणावा. . .एखादीची निवड करून या वयातहि. . .

**कीचक**– ताई, किती भोळीभावडी आहेस तूं. .तूं केवळ माझ्या-करिता म्हणून पसंत केलेल्या दासीवर. .तूं म्हणतेस त्याप्रमाणं त्या



भारतीय 'कॅप्टन्सी' गाजत आहे





वेषांतरीत राजकन्येवर. . .मी भाळला जाईन असं वाटतं तुला ?. . तूं तिला सै-रं-न्री म्हणतेस नाही. .नांव तर मोठं विचित्र दिसतं..परंतु हिचा चेहरा पाहिला की कित्येक वर्षापूर्वी पाहिलेल्या त्या सुकुमार मुखकमलाचा भास होतो. (दुरून बल्लव त्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकतो). .त्या मुखकमलानं माझं हृदय इतकं आकृष्ट करून घेतलं की अन्यत्र आसक्त होण्याची प्रीति भावनाच पार मारून टाकली. .आणि म्हणून म्हणतो ताई, प्रीतीच्या आणाभाका, संकेत स्थळं आणि प्रणय-लीला यांना माझ्या हृदयात स्थानच उरलं नाही. . .(कारंजा भोवती फिरत असताना). .या स्थळासंबंधीच्या पूर्वकथा तूं ऐकल्या आहेस ना?. .देवदेवतांच्या मीलनाचे हे एक पवित्र क्षेत्र होतं. .कुठला तरी प्रियकर इथं यायचा. .कुणाला तरी खुणा करायचा. .नि मग दुसरी व्यक्ती. .त्याची प्रिया इथं यायची. . .ते कसे आणि कुठून येत याचा पत्ता लागत नसे. . .पण येत मात्र असत. .आणि नंतर आपल्या पूर्वजां-पैकी निदान वीस-पंचवीस दंपतीनी प्रणयक्रीडेचा श्रीगणेशा इथंच केला. . .प्रियेला घेऊन या स्थळी येण्याचं भाग्य माझ्या कपाळी नव्हतं. . .निदान आता उत्तरा-अभिमन्यूंनी ही पूर्वापार चालत आलेली परंपरा पुढे चालू ठेवावी एवढीच इच्छा आहे. .तेव्हा ताई, मी माझ्या प्रीतीच्या आणाभाका इथं वाहण्याच्या. . .कारण कल्पनेतहि ही गोष्ट या जन्मी शक्य नाही—तूं आपल्या डोक्यातून पुरतेपणी काढून टाक. . .आणि उत्तरेने अभिमन्यूची निवड करावी म्हणून त्याचा कसून शोध कर. . .त्यांचा विवाह झालेला पाहिला म्हणजे माझ्या मनाला संतोष होईल. .नि तुलाहि आनंद होईल. त्यांच्यासारख्या अनुरुप वधुवरांना एकमेकाची भेट घेण्यास या स्थळा-इतके चांगले नि पवित्र क्षेत्र दुसरे नसेल! ज्याचा भूतकाळ मृतवत् आहे नि भविष्यकाळ दुःखपूर्ण आहे व उत्साहशून्य आहे अशा माझ्या-सारख्याना ही जागा सर्वथैव वर्ज्य आहे. . .उत्तरा-अभिमन्यु यांच्या सारख्यांच्या प्रीतीचे पहिले संकेतस्थान होण्याच्या योग्यतेची ही जागा असल्यानं तिच पावित्र्य टिकवलंच पाहिजे. .ताई! क्षुद्र व्यक्तींच्या पद-स्पर्शानं या जागेचं पावित्र्य नष्ट होऊ नये म्हणून अहर्निश काळजी घ्यायला हवी. . .अभिमन्यूच्या शोधार्थ अद्याप तूं कुणाला धाडलं नाहीस का? त्याला शोधून काढण्याची त्वरा कर. . .

[ बल्लव आणि सैरंध्री रोज एकमेकाला मध्यरात्री याच जागी येऊन भेटत असल्याने हे बोलणे ऐकून बल्लव घाबरतो. इथंच बल्लव भीम होऊन सैरंध्री—द्रौपदीला—रोज आश्वासन देई—, अज्ञातवासाचा काळ संपताच सुयोधनाला ठार मारून, तुझा मान राखेन. . . . .कीचकाचे हे बोलणे ऐकून बल्लवापुढं असा प्रश्न पडतो की या स्थळी तूं पुन्हा येऊ नकोस असे द्रौपदीला सांगाव-याचे कसे? तसे करण्यास त्याला वेळच मिळत नाही. . .त्याचे मन विलक्षण अस्वस्थ होते व काही काळ तो चिंतामग्न होतो. कीचकाच्या बोलण्याने त्याचे लक्ष सारखे त्याच्याकडे वेधले जाते. त्याचे शब्द ऐकून तो दुःखी व साशंक होतो ]

**सुदेष्णा**:—होय दादा! तुझी इच्छा आम्हाला प्रमाण आहे. तुझ्या दोन इच्छा यापूर्वीच पूर्ण झाल्या आहेत. एक म्हणजे ह्या जागेचा ताजेपणा, पावित्र्य आणि सौंदर्य अबाधित राहिल याविषयी तूं निश्चित रहा. कोणत्याहि क्षुद्र व्यक्तींच्या पादस्पर्शानं या जागेचं पावित्र्य नि प्रतिष्ठा कलंकित होणार नाही, यास्तव मी सदैव जागरूक आहे. . . . .आणि माझ्या माहितीप्रमाणे आजपर्यंत हे पावित्र्य अबाधित राहिलेलं आहे. आपल्या कुलात जन्म घेतलेल्या किंवा आपल्याशी रक्ताचं अथवा धर्माचं नातं असलेल्या स्त्री पुरुषांखेरीज कोणीहि अद्याप या स्थळी आलेलं नाही. . . . .याला फक्त एकच अपवाद मी आजपर्यंत केला आहे. आणि तो म्हणजे सैरंध्री. . . .ती आणि तिचे. . . . . .

**कीचक**:—कोण सै-रं-ध्री! नि ती इथं येते. .ती कोणीतरी वेषांतरीत राजकन्या असून अद्याप अविवाहित आहे असं तूं मला सांगितल्यासारखं वाटतं. . .पण ती कोणी का असेना. . .तिला इथं यायचं कारण? आपल्या राजघराण्यांशी तिचा रक्ताचा संबंध आहे?. . .तिचे पति इथंच आहेत. . .? मी एकलं ते बरोबर आहे ना?

**सुदेष्णा**:—तूं ऐकलंस ते बरोबर आहे. . .तिचा आपला रक्ताचा संबंध नसला तरी ती राजघराण्यातील रक्ताचीच आहे अशी माझी खात्री आहे. .तिनं आपलं प्रेम पांच पतींना—देवांना-मानवांना नव्हे अर्पण केलं असून त्यांना भेटण्यासाठी या स्थळाचा उपयोग करू देण्याची तिची विनंती मी मान्य केली आहे. . . देवांचे पाय या स्थळाला लागत असल्याने या स्थळाच्या पावि-त्र्यात अधिकच भर पडत आहे. .ती बिचारी आधीच दुःखीकष्टी आहे. .तिची ही एवढीशी विनंती अमान्य करणं माझ्या अगदी जिवावर आलं....तिला या जागेचा संकेतस्थळ म्हणून उपयोग करण्यास मी अनुमति दिली.. यात माझं काय चुकलं...? तुझी काही हरकत आहे का?

**कीचक**:—नाही, तसं काही चुकलं नाही. . .नि जोपर्यंत या स्थळाचं पावित्र्य भंगत नाही तोपर्यंत माझी काही हरकतहि नाही..माझी दुसरी कोणती इच्छा पूर्ण झाली म्हणालीस? अभि-मन्यूच्या शोधार्थ कोण नि कधी जाणार आहे?

**सुदेष्णा**:—त्याचा शोध तात्काळ घेण्याकरिता विश्वासार्ह माणसांची मी चारी दिशेला रवानगी केली असून त्याची वार्ता मला ताबडतोब कळविण्याची त्याना आज्ञा केली आहे..

**कीचक**:—(वेडावून) तूं दुसऱ्या माणसांना का धाडलंस? अभिमन्यूला शोधून काढण्यास मी एवढा आतुर आहे की याच्या शतांशसुद्धा तत्परता इतरात असणार नाही...पार्थ किंवा वृकोदर यांना शोधून काढल्याशिवाय त्याचा पत्ता लागण्यासारखा नाही.. भीमाला पाहताक्षणीच मी ओळखेन कारण किती केलं तरी तो —बलरामशिष्य—माझा गुरुबंधु आहे. नि तुला ठाऊकच आहे की मी एखाद्या गोष्टीत एकदा लक्ष घातलं की तिचा पिच्छा सोडत नाही.. मीच स्वतः जायला हवं होतं....लांडग्यासारखा खादाड परंतु माझी केव्हाही बरोबरी करू न शकणारा वृकोदर...त्याला पाहताच अभिमन्यूचा शोध लागेल... तुझा तो नवा सूपकार



अनुक्रमणिका

पाहून मात्र मला त्या वृकोदराची आठवण झाली...सारंच विचित्र... भीम सांपडला की अभिमन्यूचा शोध लागलाच. .त्याच्या किंवा अन्य पांडवाच्या शोधार्थ मी माझ्या वेगवान अश्वांचा उपयोग केला....

**सुदेष्णा**:—या महत्त्वाच्या कामासाठी आपले वेगवान् हत्ती, घोडे, उंट धाडले आहेत. तूं काळजी करू नकोस. . . .

**कीचक**:—माझी थट्टा करतेस काय, ताई? आमच्या वडिलांच्या आणि वृद्ध अश्वपाळ गजपाळांच्या मृत्यूनंतर उत्कृष्ट असे हत्ती, घोडे आपल्या पागातून राहिलेच आहेत कुठे? गेली पंचवीस वर्षे स्वारीहून परत येताना नव्या दमाचे धष्टपुष्ट हत्ती, घोडे आणून आपल्या पागा समृद्ध करण्याचा मी प्रयत्न करीत आहे खरा, कारण मला माझ्या भोवती वावरणारी माणसं आणि प्राणी हे समर्थ आणि बलशाली असले तरच आवडतात. आपल्या गोशाळा आणि पागा समृद्ध करण्यासाठी तरी मला दरसाल स्वारीवर जाणे भागच पडते... नि तूं मला वेगवान हत्ती घोड्याविषयी सांगावंस.. ते असलेच तर आपल्या राजधानीबाहेर आहेत. . . आत नाहीत.

**सुदेष्णा**:—दादा, माझं म्हणणं तर जरा ऐकून घेशील की नाही.. गेले आठ-दहा महिने प्रतिनकुल असाच एक माणूस आपल्या पागांची देखभाल घेत असल्यानं आपल्या गोशाळा, अश्वशाळा नि गजशाळा उमद्या आणि धष्टपुष्ट जनावरांनी फुललेल्या आहेत... मी थट्टा करत नाही.. वस्तुस्थितीच सांगते——

**कीचक**:—काय म्हणालीस? नकुल ! चौथा पांडव ! तो नि इथं? आपल्या पागांची देखभाल करीत आहे?...अग मग अभिमन्यूचा शोध घ्यायला उशीर कशाला? शोध इथं संपलाच म्हणायचा! चल, आतांच त्याच्याकडं जाऊ नि त्याला त्याच्या इतर भावांची हकिगत विचारू. पण थोडी थांब. तो आपल्या भाऊबंदांना सोडून इथं कशाला येईल?

**सुदेष्णा**:—दादा, उतावीळपणानं तूं पुरतं ऐकून सुद्धा घेत नाहीस नीट.. मी नकुल म्हटलं नाही. 'प्रतिनकुल'—नकुलासारखा माणूस—असं म्हटलं. तो गेले काही महिने पागाधिकारी म्हणून काम करीत आहे. तो नकुलासारखी राखण करतो असं मी म्हटलं. खोटं वाटत असेल तर तूं स्वतःच पागांकडे नजर टाकेनास!

**कीचक**:—तूं म्हणतेस ते असेल खरं... राजकुलोत्पन्न पंडूपुत्र नकुल आपला मोतधार असावा असं समजणंहि मुळात चुकीचं आहे. ताई, माझ्या डोक्यात सध्या एकाच व्यक्तीचा विचार चालू आहे. अभिमन्यु! अभिमन्यु! ! अभिमन्यु ! ! ! तो वडिलांसारखा धनुर्धर नसून काकासारखा मल्ल आहे. माझ्यासारख्या वीर अर्जुनाचा पुत्र जो अभिमन्यु—त्याच्याशी उत्तरेचा विवाह कधी होतो असं झालं आहे मला..ह्या एकाच गोष्टीनं माझं मन इतकं गुंग झालं आहे की इतर गोष्टीचं मला भानच उरलेलं नाही. आपल्या राजघराण्याची परंपरा माझ्यानंतर तशीच चालू ठेवण्यास माझ्या दृष्टीनं तोच एकमेव नि सर्वथैव योग्य आहे... त्यानंच या भूमीवर राज्य करावं..

**सुदेष्णा**:—त्याच्या संबंधीची माहिती आपल्याला लवकरच कळेल. तू त्यावावत निश्चिंत रहा.. मलाही तोपर्यंत चैन पडणार नाहीच! तुझ्या मेव्हण्यांना – सम्राटांना प्रसंगानुरूप नि योग्य सल्लामसलत देण्यास योग्य असा कोणी एक कंकभट नांवाचा एक पुरुषहि काही दिवसापूर्वीच आम्हास लाभला आहे. त्यांचीहि या कामी मदत होण्यासारखी आहे. त्यानी खूप प्रवास केला आहे.

अशी त्यांची ख्याति आहे. त्यांची न्याय देण्याची पद्धति पाहिली तर त्याला 'न्यायाधीश ही पदवी सार्थ व्हावी. कित्येकदा इकडे थट्टेनं त्यांना–थोरल्या पांडवाच्या–धर्माच्या–नांवानंच हाका मारणं होतं.. त्यांना ते शोभून दिसतं असं मलाहि वाटतं. त्यांची आताच गाठ घेऊन मी त्याना सल्ला विचारते...

**कीचक**:–धर्मराजासारखा सल्लागार! माझ्या मनाला भ्रम तर झाला नाही ना! नृत्यशाळेतील अर्जुनासारखे नवे नाटयाचार्य, पाकशाळेतील भीमासारखा नवा सूपकार, नकुलासारखा पागाधिपति नि हा धर्मराजासारखा सल्लागार....नि आता आणखी कोण राहिलं! यांच्यापैकी कुणालाहि पाहताच पांडवांचीच आठवण व्हावी... नि माझ्या सेवेसाठी नेमलेली सै-रं-ध्री.. तिला पाहताच मला द्रौपदीच्या सौंदर्याचा साक्षात्कार तिच्या ठायी झाला... तुझ्या बोलण्यामुळं आजच मला पांडवांची नि विशेषतः त्यांच्या गृहिणीची आठवण व्हावी, भास व्हावा हा योग मोठा विलक्षण आहे... माझी मृतंवृत् झालेली प्रीत भावना चेतवण्याची कामगिरी तू जिच्यावर सोपवली आहेस त्या सै-रं-ध्रीची पावलं माझ्याच मंदिराच्या दिशेनं पडत आहेतसं वाटतं.. ती माझ्या सेवेसाठी बिचारी तिष्ठत बसेल! (मोठमोठ्यानं हंसत) सै-रं-ध्री! ताई, कीचकानं द्रौपदीच्या ऐवजी एका यःकश्चित दासीचा स्वीकार करायचा...हे कदापीहि शक्य नाही! कीचक याला बघणार नाही. असली शरणागति त्याला मानवणार नाही! ताई, या कामात तुला पराभव पत्करावा लागेल... चल उचल पावलं. आतां मी थकलो आहे....

**सुदेष्णा**:–(कीचकाच्या पाठोपाठ जात) तुझ्या प्रीतीच्या स्फुल्लिंगातून ज्योति निर्माण करण्याच्या प्रयत्नात पराभव पत्करावा लागला तर त्यातहि मला आनंदच आहे. दादा, केवळ तुला सुख लाभावं म्हणूनच मी माझ्या जिवाचा इतका आटापिटा करते आहे!

**कीचक**:–भावी सुख! मोहिमांशिवाय कीचकाला या जीवनात दुसरे सुखच नाही. सतत मिळणाऱ्या या यशाचा मला कंटाळा आला आहे.. प्रत्यक्ष मृत्यूशी.. किंवा त्याचे जे कोणी भाऊबंद असतील–त्यांच्याशी टक्कर देताना आयुष्यात निदान एकदा तरी अपयश मिळावे हीच माझी इच्छा आहे. ताई, रात्र बरीच होत आहे.. जुन्या आठवणींमुळे झोपहि चाळवली जात आहे.. जाऊ दे मला ..मिळेल तेवढी तरी विश्रांति घेऊ दे.. माझ्या जीवनातली जरी ही\शेवटची रात्र ठरणार असेल तर ती तरी निदान शांतपणे मला लाभू दे.. स्वप्नांचा सुद्धा मला त्रास नको आहे–मी कंटाळलो आहे. अगदी त्रस्त झालो आहे....

**सुदेष्णा**:–जा, तू आपल्या मंदिराकडं.. नि विश्रांति घे.. या नव्या दासीचा चेहरा जर तू डोळे भरून पाहिलास तर माझी खात्री आहे की झोपेतून उठल्यावर उद्या तू एका नव्या जगात प्रवेश करताना दिसशील. दिव्य प्रणयानं तुझं सारं जीवन रसरसलेलं असेल...ज्या स्त्रीच्या आठवणीनं तुझं मन विव्हळ झालं आहे, तिच्याच सारख्या दिसणाऱ्या या नव्या दासीमुळं तुझ्या वठलेल्या प्रीतीला नवी पालवी फुटेल... काय सांगावं?

**कीचक**:–मी जितका निग्रही तितकी तू कोडगी.. तुझं वय वाढलं असलं तरी बालवयाला शोभणारा हट्ट मात्र अद्याप कमी झालेला दिसत नाही.. तो कमी करणं मोठं कठीण आहे—तुझ्या सद्हेतुविषयी माझी खात्री आहे. माझ्या जागृत झालेल्या पूर्वस्मृति आणि तुझी ही नवी दासी यामुळे उत्तरेच्या सुखासाठी अभिमन्यूचा शोध लावण्यास मदत व्हावी एवढीच इच्छा आहे.. (आपल्या मंदिराच्या पायऱ्या चढत असता तो सुदेष्णेला जाण्यासाठी खुणावतो नि तो जातो.)

**सुदेष्णा**:–(स्वतःशीच) देव तुझं भलं करो! सैरंध्री नि कीचक यांच्यावर मदनाची नितांत कृपा होवो! सैरंध्री, माझी वहिनी व्हावी आणि कीचकाबरोबर या राजोपवनात त्यांनी विहार करावा–हे पाहण्याचं भाग्य मला लाभू दे... दादा, तुझी मृतवत् झालेली प्रीत भावना ह्या सैरंध्रीमुळं पुनर्नव होवो, नि तुमच्या प्रीतीच्या आणाभाका इथं–या पवित्र स्थळी–उत्तरा–अभिमन्यूच्या अगोदर होऊ दे.. तुम्हाला दोघांना एकत्र विहार करताना पाहणं मला व सम्राटांना किती सुखदायक होईल.... परमेश्वरा, दादाला उदंड आयुष्य लाभू दे....

[असे स्वतःशीच बोलत बोलत ती अंतःपुराकडे जाते.. बल्लवाने हे सारं भाषण त्यांना कळू न देता ऐकलं आहे. त्याच्या मनाला विलक्षण यातना होतात. असहाय्यतेने त्याचा चेहरा काळवंडतो.. पडदा पडतो..]

[क्रमशः]














सौ. मंदा गोगटे

**तो** आवाज अजून घुमतो आहे, तीव्र होत आहे. पण कधीतरी हे संपायलाच पाहिजे होतं. झाला तो शेवट ठीकच झाला म्हणायचा.

तसं पहाता त्याचं जगच वेगळं होतं– एका लिबलिबीत विचाराने पोखरलेलं. तिला वाटलं त्याच्या जगात त्यानं स्वच्छंदानं विहरावं पण इतरानाही आपल्या जगात ओढणारी ही विचित्र धडपड का?- अगदी शिसारी येणारी जीवघेणी धडपड. त्यानं त्याच्या रेषेनं जावं नि मी माझ्या. ह्या दोन रेषा समांतरच राहू देत.

आन्तरिक–सौंदर्य नि कोवळी भावुकता ह्यावर प्रेम करणारी ही विलक्षण माणसं. मला नाही त्यांच्यापर्यंत पोचायचं. व्यवहार कसा तो त्यांना स्पर्शच करू शकत नाही. पण...? पण हे तरी खरं का?....कां आपल्याला आवडलं त्यावर अधिकार करण्याची ही विचित्र लालसा?

...खूपसे लॅटीन शब्द असलेली ती कविता. त्या शब्दांत गोंधळलेली ती. तिला त्या कवितेचा अर्थ किती वेळचा कळतच नव्हता, उलगडत नव्हता. नि मग सहज आलेला विचार....काहीसा हुपार असलेला तो. सुनंदाला वाटलं त्याला विचारलं तर?...हो, काय हरकत आहे?

काहीशा धागधुगीतच शब्द निसटले.

"एस्क्यूज प्लीज"

"अं, तुम्ही होय"

"मला या कवितेचा अर्थ सांगता?"

"हो. by all means"

पण तो अर्थ! नि ऐकता ऐकता निर्माण झालेला संकोच. नकोच होती ही कविता विचारायला. किती विचित्र कविता. विचित्र?....विचित्रच नाही तर काय– तो ग्रीक सैनिक नि ती खेडवळ मुलगी– त्याच्या भावमधूर शब्दांवर लुब्ध होऊन अचानकपणे त्याच्यावर लुब्ध झालेली.

असं क्षणात घडणारं दुबळं प्रेम. सुनंदाला ते पटतच नव्हतं. शब्द तरळत होते— "A Romantic Poem."

छे, छे. उगाचच ही कविता विचारली. नेमकी ही कविता विचारली गेली.



**त्याची ती न सोसवणारी जवळीक....नि भावूक नजर..पण कां? उत्तेजनाशिवायच उत्कट कां व्हावं ? नि त्या उत्कटतेचाही विचार कां करावासा वाटावा.... ?**

आधी त्या कवितेचा जरा जरी अर्थ समजता–अंधुकशी जरी कल्पना असती तर हे अडवता आलं असतं–सारं कसं तिथंच संपणार होतं.

"A love at first sight" तो भारावून शिकवत होता.

सुनंदा दचकली. हा असा कां?

तिला वाटलं त्यानं इतकं भारावू नये– नको नको. त्याने आता येथेच थांबावे, येथेच स्थिर व्हावे.

पण त्याच्या चेहेऱ्यावर भावुकता नुसती ओसंडली होती–ती कोवळी भावुकता. चेहेऱ्यावरची रेषन् रेष अंतरंगातील ठाव सांगणारी. पण....पण हे सारं प्रतिसादाशिवायच?....त्याचं ते रूप! मला नाही तो आवडला.

कदाचित....कदाचित नेमकी ही कविता विचारली म्हणून तर तो भारावला नाही?...........शिसारी आणणारा तो विचार. ती त्या विचाराला जो जो ढकलू पहात होती, तो तो आणखी आणखी रूप घेऊन तो विचार पुढे पुढे येत होता.

स्वतः सांडून, तो कविता शिकवत होता—जणू तो स्वतःच ग्रीक सैनिक झाला होता......आणि मी?.... नको–नको. मला हे नको आहे. त्यानं इतकं कां भारावून जावं? इतकं सांडून जायचं की स्वतःचं वेगळं अस्तित्वच उरू नये. नि त्याचे ते स्थिरावलेले डोळे नि ती नजर! त्याची ती वृत्ती पाहून ती विलक्षण कासावीस झाली. ह्यानं इथंच थांबावं, असं तिला एकसारखं वाटू लागलं.

कदाचित ह्या कवितेच्या रूपानं तो ह्या समांतर रेषा सांधायचा तर प्रयत्न करत नाही?........त्या जाणीवेनं ती विलक्षण बेचैन झाली. एक ठराविक अंतर ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न करू लागली. पहाता पहाता बुद्धीपुरःसर बेपर्वाई आली—नि त्याच्या सहाय्याने त्या कवितेच्या आशयालाच दूर दूर सारण्याचा प्रयत्न करत म्हणाली——

"काहीतरीच! एवढ्याशा कारणानं ती मुलगी प्रेम कसं करू लागेल?"

"हो ना. प्रेम आंधळं असतं." तो ओढाळ नजरेनं म्हणत होता.

तिला त्याची शिसारी आली. तो वेग. त्याचं झालेलं ते हळूवार मन. तिला सारे अगदी असह्य झालं. ती जास्तच रुक्षपणे म्हणाली––

"हं. प्रेम आंधळं असतं....सगळा मूर्खपणा."

"तरी लोक करतातच ना?"

हा असा चिकट! कसा तो दूर सारताच येत नाही. त्याचे ते स्थिरावलेले डोळे––नको—पहावतही नाही.

"पण नावडलेल्या गोष्टीवर प्रेम करायचं? मला तर वाटतं पक्क व्यवहारी असावं."

"पण आंतरिक सौंदर्य म्हणूनही काही आहे. त्यालाही किंमत आहे."

....क्षणकाल आलेली स्तब्धता.... नि मग अधिकच उंचबळून शिकवत असलेला तो——वेग आणखीनच वाढतो.

आंतरिक सौंदर्य?....पण ते गवसतं कसं? बाह्यसौंदर्य नसतं, त्याच्याजवळ आन्तरिक सौंदर्य असतं का?.....तसं असायला ते काय गणित आहे?...नेमकं उलट कशावरून नाही......आंतरिक सौंदर्याला मानणारा तो, मग त्याची बाह्यसौंदर्याविषयी ही विचित्र ओढ कां?.....

ते काय वाटेल ते असो, पण ह्या समांतर रेषा सांधल्या जाऊ देत नको. तो त्याच्या मार्गाने जाऊ दे. नि मी माझ्या. त्याची जवळीक मला सोसवणारी नाही; अगदी मुळीच नाही.

मला नको आहे त्याचं हे खळबळून नि उचंबळून वागणं. अगदी दूर जावं त्यानं......अगदी दूर दूर. ती पहाता पहाता तुटक झाली. नि अचानक शब्दाना धार चढली.

"मला नाही पटत हे आंतरिक सौंदर्याचे गोडवे."

किंचित हसून नि ती जणु त्या कवितेतील खेडवळ मुलगी—अशा थाटात तो समजावू लागला——

"आतापर्यंत कवी, साहित्यिक अनेकानी त्याचे गोडवे गाईले आहेत. तेव्हा न पटून कसे चालेल."

नि मग झालेला निकराचा प्रयत्न—

"ज्याच्याजवळ बाह्यसौंदर्य नाही त्याने आंतरिक सौंदर्याचे खुशाल गोडवे गावे."

...कमालीचा दुखावला गेलेला तो.

तिला विलक्षण आनंद झाला. ती सांधू पहाणारी रेषा आता दूर दूर गेलेली होती. अगदी क्षितीजापलिकडे–त्या जाणीवेने ती उल्हसित झाली नि तो कासावीस.

घरी जाताना कमालीचं गोंधळलेलं मन. पण......पण कदाचित सहजही सारं झालं असेल. पण कसं शक्य आहे? ते स्थिरावलेले डोळे. सारं काही सहज! सहज? सहजच सारं असू दे.

....धुंद वारा नि कोसळता पाऊस. सरीनी आलेला वेग. धूसर झालेली झाडे– जणु कोणाची प्रतीक्षा पहात उभी राहिलेली––भारावलेली, पाण्याने निथळणारी. संथ लयीत झेपावत झेपावत पुढे सरकणारे ढग. सर्वत्र निथळत रहाणारी धुंदी नि वेडंपिसं करणारं आगळं चैतन्य निर्माण होत होतं. तिला वाटलं या पावसात हिंडायला किती मजा वाटेल.

त्या सरी सुनंदा किती वेळची पहात होती. पण होत जाणारा अंधार पाहून तिची वाट पहाणाऱ्या आईची आठवण झाली. ह्या पावसानं थांबावं आता. छत्रीविना थांबलेली ती. काहीशी कंटाळली

चिडलेली. हळू हळू आणखीनच होत जाणारा अंधार.

...तो...तो तर नाही येत?...... हो, तोच. नेमक्या अशावेळी त्याची भेट. भेट?.......नव्हे. नव्हे. होणारी औपचारिक ओळख......नाही. तसं नव्हे. मग कसं?....जाऊ दे.

आत्ता हा कशाला आला?—कपाळा-वर आठी आणून दर्शित होणारा प्रश्न. निथळता रेनकोट काढता काढता तो म्हणत होता.–

"गारवा किती मस्त आहे नाही ?"

"..............."

"एका माणसाचं लक्ष कुठंय"–तीच ती स्थिरावणारी नजर.

"एऽऽ काय विचार चाललाय?"

"अं, काही नाही"

हा आत्ता ए म्हणाला? कां? कां? दोघांच्यातलं अंतर तो कां तोडतो आहे? ही चिकट जवळीक !

"अग थांबलीस."

हा अग तु ग कां म्हणतो? सारं काही सहजच ? ही अशी जवळीक कशाकरता?... सारं काही हेतूशून्यच का?

"छत्री आणायची विसरले."

परत ओथंबून आलेला तो—

"काहीसा आवेग निर्माण करणारा हा पाऊस मला चिरपरिचितसा वाटतो. मला अशा पावसात भिजावसं वाटतं, धुंद व्हावसं वाटतं. तुला नाही वाटत?"

मग जात कां नाही—निर्माण झालेला चिडका स्वर.

"येतेस. आपण दोघं जाऊ."

"छे, छे, नको."

"भित्रीच आहेस."



"असू दे."

"चल ना."

"नको."

आता आणखी कोणीतरी तिसरं यावं. मनात आलेला तो विचार नि निर्माण झालेली आशा. कोणीतरी यावं—दोघात तिसरं नि हा हळवा स्वर नष्ट व्हावा. ह्या संथ नि मंद वातावरणाला भेद जावा. नि कोणी येतं का ह्याची वाट पहात असलेली ती.

"काय पहातेस? त्या सरीना? कशा बेफाम होऊन पडताहेत. काहीतरी आपल्याला त्या सांगताहेत का ?

...पुरे. पुरे...आता हे अगदी जीवघेणं झालं. चीड आणखी आणखी तीव्र होऊ लागली.

..इथून पळून जावं—ह्या पावसात?......पण तोही कदाचित् बरोबर येईल. ह्या पावसासारखाच धुंद होऊन.......छे छे नको.

कशाला एवढं धुंद होऊन वागतो?—मला तो आवडत नाही नि तरी हे विपरीत वागणं कां? वाटतं त्याचे ते सारे शब्द नको असता अंगाला चिकटत आहेत–एखाद्या जळूसारखे. मूर्खपणा म्हणावा अशी भावुकतेची लाळ माझ्याशी निगडीत कां?

शेवटी पावसालाच आलेली कीव. नि तो थांबलेला पाऊस पाहून तिचं उजळलेलं मन.

"बरं मी जाते"

"मी येऊ पोचवायला. अंधार झालाय."

...नको. नको. ती धुंदी नि तो हळवेपणा आता माझ्याजवळ नको. ह्या अशा अंधाराचीही भीति वाटत नाही त्यापुढे.

"नको मी जाईन."

"हवं तर येतो."

"नको, नको."

नि प्रत्युत्तराची वाट न पहाता काहीशी झपाटल्यासारखी ती निघाली. जणु मोठ्या दिव्यातून पार पडली. मोकाट सुटलेला वारा—त्या वाऱ्यासारखंच तिला मोकळं मोकळं वाटत होतं, मुक्त झाल्यासारखं.

...डोळ्यात थैमान घालणारे काहूर. सारं काही सहज? नव्हे नव्हे. अगदी अशक्य. अशक्य? मग सारे काही घडत आहे ते तीं वेगळी अशी जाणीव ठेवूनच ना. पण असा कां? कां असं व्हावं?.... नि आता मार्ग? पण हे सारे माझ्याभोवती अकारण का घोंघावते आहे? मनात नसता निर्माण झालेले हे घोंघावते वादळ. प्रतिकार करणं जमेल? सामोरी जाणं साधेल?—नुसतंच सामोरी जायचं?. ....नाही, ते वादळ स्थिरपणे, काहीशा निर्दयपणे दूर सारायचं.

त्याची ती न सोसवणारी जवळीक नि भावूक नजर......पण कां? उत्तेजनाशिवायच उत्कट कां व्हावं? दुसऱ्याशी अशी लय साधताना प्रतिसादाची जरूरीच नाही? त्याचं ते बोलणं, वागणं मला नाही आवडत. सदा स्वप्नाना गोंजारत असतो.....स्वप्न? कसली स्वप्नं? ......नको. नको. हे कोठे तरी थांबायलाच पाहिजे, संपायला पाहिजे —— अगदी खुडून टाकायला पाहिजे.

पण....पण त्याची ती जवळीक खुडून टाकताना तो कसा होईल?.... विव्हळत, प्रेताप्रमाणे पांढराफटक झालेला तो चेहरा. –उन्मळून पडल्यासारखा. नि ते ओबडधोबड शरीर आणखीनच ओबडधोबड होईल. ते डोळे पार थिजून जातील. नि खुडून टाकणाऱ्यास उगाचंच हळवं बनवतील, असंभव करून टाकतील.

..छे. छे. मला हे नको आहे. माझ्यातला सभ्यपणाचा अंश मला तेही करू देणार नाही. मग मी काय करू? मला त्याला अजीबात तोडणंही जमणार नाही. ......पण मला तो जवळ यायलाही नको. खिळ कशी घालणार? शब्द सुचतील? मार्ग सापडेल?

अगदी दूर—खूप दूर गेले तर? पण पिसाटासारखा तोही पाठोपाठ आला तर—जास्तच भावुक नि हळवा होऊन.

(पृष्ठ ५० वर)






सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.
परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून खेचत रहाण्याचे तंत्र आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.
'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान होण्यापूर्वी—
एका छोट्या शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ...२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तज्ञांचा सखोल अभ्यास...मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे मनातील जिद्द.
सहाजीकच आमच्या रबरी उत्पादनांचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.
'स्वस्तिक'ची काही रबरी उत्पादने—
होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, ॲडीझीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॉम्बॅट बूट्स् व इतर विविध पादत्राणे.
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड, खडकी, पुणे-३.
TOM & BAY SR/8685-M

## ३




**पं. ज. वि. पेठे** यानी घडविलेले विसाव्या शतकातील संगीत कला क्षेत्राचे दर्शन..........त्यानी टिपलेले सूर..........काही सुरेल..........काही बदसूर..........

## लाहोरला कसा आलो ?

**आम्ही** गुरु महाराजांवरोबर फिरत फिरत गया, पाटणा, दरभंगा, मुझफ्फरपूर इत्यादि ठिकाणे करून विहार प्रांतातील सीतामढी येथे आलो होतो. तेथे सीतेचे जन्मस्थान आहे. ज्या ठिकाणी शेतातून सीता असलेली पेटी निघाली, तेथे सध्या एक मंदिर आहे. तेथून जवळच जनकाची राजधानी—जनकपुरी—आहे.

गुरुमाउलीचे बरोबर असताना माझे खास काम म्हणजे दररोज एकूण सहा ते आठ तास व तेही सकाळचे वेळेपासून गीता, भागवत, दासबोध, रामायण, रहस्य दीपिका वगैरे ग्रंथांचे पठण ठराविक प्रमाणात करून दाखवावयाचे. त्यावेळी मला त्या कामाचा बहुधा कंटाळाच येत असे. पण कळत नकळत त्या वाचनाचे जे काही संस्कार झाले त्याचा पुढील आयुष्यात बराच फायदा झाला, यात संशय नाही. त्यावेळी माझेबरोबर रघुनाथ पेंढारकर नांवाचा मुलगा होता. त्याला भ्रमंतीचा कंटाळा येऊ लागला. त्याच सुमारास श्री. धुंडीराज पलुसकर हेही पार्टीबरोबर होते. पण ऑक्टोबर महिन्यात त्याना लाहोरच्या गांधर्व महाविद्यालयाचे काम संभाळावयाचे असल्याने त्यांची लाहोरला जाण्याची गुणगूण कानी आली. पेंढारकर यालाही तेथे जाण्याची अत्यंत ओढ लागली व त्याने पंतांशी ( दिगंबरपंत संधान पण बांधण्यास सुरवात केली. पंतानाही लाहोर विद्यालयासाठी एक दोन मुले हवी होतीच. आमचे बरेचसे शिक्षण गुरुमहाराजांपाशी झाले होते. प्राथमिक शिक्षण मुंबई व नाशिकला झाले होते. तेव्हा विद्यालयात प्रत्यक्ष काम करण्याची संधी मिळेल, का याचीच आम्ही सारे जण वाट पहात होतो.

रघुनाथ (पेंढारकर)ने तर लाहोरला जाण्याची संधी मिळावी म्हणून रामायणाचा पाठ सुरू केला होता, व तो नऊ दिवसात त्याने पूर्णही केला. त्याचे फळ म्हणा वा योग म्हणा, त्याला बरोबर नेण्याचे पंतानी निश्चित केले; आणि गुरुंकडून तशी परवानगी पण घेतली, त्यामुळे तो खूष होता. तर आम्हाला अजून रखडावेच लागणार म्हणून मनातून आम्ही जरा खट्टू झालो होतो. पंताना लाहोरला जाण्यास दोनच दिवसांचा अवधी होता. त्या सकाळी मी गुरुमहाराजांसमोर पठण करीत असताना, अचानकच गुरुजीनी विचारले, 'लाहोरला जायचे आहे काय?' प्रश्न ऐकून मी चकितच झालो. जणु काय महाराज माझ्या मनातलेच बोलले. मी लाजत लाजत हो म्हणालो. पण मी गेल्यावर ग्रंथपठण कोण करणार? असा प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. इतक्यात महाराज म्हणाले, "इच्छा असेल तर जा तू लाहोरला!" (त्यावेळी मला गुरुजींकडे येऊन जवळ जवळ आठ वर्षे पूर्ण होत आली होती.) त्यानी श्री. धुंडीराजपंताना बोलावून सांगितलं की, 'यालाहि बरोबर ने' मग काय विचारता? मी व रघुनाथ दोन दिवस आनंदाने नुसते नाचत होतो म्हणाना?

दुसरेच दिवशी आम्ही सीतामढीहून पाटण्यास आलो. तेथून तुफान मेलने अलाहाबाद. तेथे श्री. व सौ. अंबुताई पटवर्धन यांचा पाहुणचार घेऊन कानपूर गाठले. तेथेही श्री. शंकरराव बोडस यांचा पाहुणचार स्वीकारून दिल्लीस आलो नि मग थेट लाहोर. नवीन प्रांत, नवीन भाषा, नवीन शहर, नवीन आचार—विचारांचे दर्शन घडले; आणि गंमत वाटली.

येथूनच माझ्या आयुष्याला निराळे वळण लागून जीवनाची गाडी ठीक मार्गाने नेण्याची जबाबदारी पडणार होती. १९२९ च्या ऑक्टोबर—नोव्हेंबरमध्ये मी लाहोरला स्थानापन्न झालो, तो १९४७ च्या जुलैपर्यंत तेथेच. तेथून नियतीनेच उठविले....

## तांबे उपहारगृह

माझे मित्र श्री. शिवराम वेडेकर ( आकाशवाणी ) यांचा विवाह मुंबईस झाला. त्यासाठी त्यानी मला खास आमंत्रण पाठविले होते. म्हणून मी व त्यांचे धाकटे बंधू श्री. राजाभाऊ असे दोघे लग्नापूर्वी चार सहा दिवस मुंबईत येऊन दाखल झालो. मी गिरगावात माझ्या मामेवहिणीकडे उतरलो तर राजाभाऊ भावाच्या मुक्कामी. लग्नाला अवधी असल्याने आम्ही दोघे दररोज भटकंती करीत असू.

असेच एका सकाळी कांदेवाडीच्या नाक्यावरील तांबे उपहारगृहात शिरलो. बाहेरच्या मोठ्या हॉलमध्येच आम्ही बसलो.

तयार जिनसांची नांवे वाचून तोंडाला पाणी सुटू लागते. कारण लाहोरला कसे मिळणार ते अस्सल मराठी पदार्थ? त्यावेळी प्लेटचा दर साधारणपणे दोन ते चारच आणे होता. (अगदी कमाल दर चार आणे). आम्ही यथेच्छ ताव मारण्यास सुरवात केली. प्रत्येक पदार्थाची एकेक प्लेट अशा आठ दहा प्लेटी तर केव्हाच उडाल्या. नंतर त्यातल्या त्यात चांगल्या वाटणाऱ्या पदार्थांची पोटभर मागणी केली. ते पाहून वाढपी व व्यवस्थापक दोघांचीहि आश्चर्यचकित नजर आमचेकडे वळली. आजुबाजूचे लोक सुद्धा एकादी मिसळ किंवा एक प्लेट भजी खाणारेच. तेही पाहू लागले आमच्याकडे. आणि 'हे कोण बुभूक्षित' असेच विचार त्यांची नजर बोलत होती.

मनसोक्त खाणे झाल्यावर संपूर्ण पैसे चुकते करून आम्ही बाहेर पडलो, तरीही नजरा पाठीवर खिळल्यासारख्या वाटत होत्या. दुसरेही दिवशी पुन्हा आम्हाला लहर आली व आमचा मोर्चा वळला तांब्यांकडे! आम्ही आत शिरताक्षणी कालच्या वाढप्याने जोरात सलाम ठोकला व व्यवस्थापकही हंसतमुखाने सामोरे आले व म्हणाले, 'आपण आतल्या स्पेशल खोलीत बसावे व आवडतील ते पदार्थ मागवून घ्यावेत. त्यांच्या सूचनेचे स्वागत करून आम्ही स्पेशल रुम गाठली व यथेच्छ हात मारला. तो फरक आमच्या आधाशीपणाच्या खाण्यावरूनच झाला एवढा तर्क मात्र आम्ही केलाच आणि स्वतःशी हसलोहि तेव्हा.

## आणि लाहोरची खाणावळ

लाहोरला एक गुजराती लॉज़ होते. बहुतेक महाराष्ट्रीय मंडळी त्या लॉजमधेच जेवावयास जात. त्यावेळी त्याचा दरही महिना ३५ रुपये होता. श्री. महादेवकर नांवाचे एक गृहस्थ नुकतेच तेथे बदलून आलेले होते. श्री. बाबुराव राजंदेरकर यांच्या ओळखीने त्यांचाही प्रवेश लॉजमध्ये झाला. गृहस्थ तरुण व शरीराने भक्कम असल्याने आहार चांगलाच होता. त्या लॉजमध्ये गुजराती तऱ्हेचाच स्वयंपाक व लहान लहान कागदवजा फुलके बनत असत. चांगल्या आहाराच्या माणसाला १२–१४ फुलके सहजच लागत असत. मग आमचे हे मित्र तर महाराष्ट्रातून आलेले व तंदुरुस्त. त्याना तर वीस फुलक्यांपेक्षा कमी कधीच चालत नसत. त्यामुळे लॉजचा मालक हळुहळू तंग होऊ लागला; आणि दोन महिन्यानंतर बाबुरावाना म्हणाला, मालक या गृहस्थाना एवढ्या पैशात जेवण देणे आम्हाला परवडणार नाही. तरी त्याना पुढील महिन्यात दुसरीकडे व्यवस्था करण्यास सांगा.

ते बाबुरावांनी प्रथम आम्हाला सांगताच आम्हा सर्वांना एकदम हसू आले व श्री. महादेवकर यांची आम्ही खूप चेष्टा करू लागलो. आणि त्याना म्हणालो, 'पुढील महिन्यात तुम्हाला जेवण देणार नाही, असे लॉजवाला म्हणतो. मग आता काय करणार? पण गंमत अशी की त्यानंतरही ते गृहस्थ त्याच लॉजमध्ये कित्येक महिने जेवत असलेले आम्ही पहात होतो नि त्याचे आश्चर्यही वाटत होते. एकीकडे मालक ओरडत होताच. दुसरीकडे महादेवकरांची मेंबरशिप चालूच होती. हे घडले कसे?

अखेर महादेवकरानीच आम्हाला त्यातले गुपित सांगितले. ते दर महिन्याच्या शेवटच्या तारखेस लॉजवाल्यास ३५ रुपये देत असत. त्या दिवशी साहजिकच त्याचाही हात तंग असे. त्यामुळे त्याला रुपयांचा मोह सोडवेना. मग पुढील महिन्याचे पैसे आगाऊ घेऊन त्यांच्या नांवाने पुन्हा महिनाभर ओरडत असे. पुढे लॉजवाल्याचा वाढपी मालकाच्या सांगीनुसार वाढप करताना महादेवकरांकडे दुर्लक्ष करू लागला. दोन चार पोळ्या वाढून मधेच बराच वेळ त्यांचेकडे तो लक्षच देत नसे. पण तेही असे खमके की त्यांचा कोटा पूर्ण झाल्याशिवाय पानावरून उठतच नसत. त्यामुळे कित्येक वेळा ते ८॥ ते १० पर्यंत पानावरच बसलेले दिसत. यांचे मागून आलेले कित्येक लोक त्यांचेपूर्वी जेवूनही जात असत. सांगायचे तात्पर्य काय तर महादेवकर आणि आमचा लॉजवाला दोघांची ती विरोधी भक्ती ही गोष्ट आमच्या समकालीन मित्रमंडळींच्या आठवणीत चिरंजीव बनून राहिली. जेव्हा जेव्हा कोठेही भोजनभाऊंच्या गप्पा सुरू होत, तेव्हां तेव्हा तो किस्सा मोठ्या मजेदारपणे सर्व जण सुनावीत असत.

## कोहळा मिळाल्यानंतर आवळा दिला

माझ्या एका गुरुबंधूनी आयुष्यात खूप धन संचित केले. मेहनत नि त्याहीपेक्षा कवडीचुंबक स्वभाव हे त्यांचे वैशिष्ट्य. ते लाहोरला रेडियो, संगीत-जलसे वगैरे निमित्ताने अनेक वेळा येत असत. आणि माझे जिवलग स्नेही श्री. वि. म. कुळकर्णी यांचेकडे त्यांचा मुक्काम असावयाचा. फिरणे, हॉटेल, चहापाणी या साऱ्या गोष्टीत ते बहुधा आमचे बरोबरच असत. मात्र प्राणी हाताचा महा चिकट. त्यानी कुणालाही कधीही एका पैशाचे खाऊ घातले नाही. असेच नेहेमी चालावयाचे.

तरीपण एकदा काही मंडळी त्यांचे मागे उगीचच लागली व त्याना गळ घालू लागली, 'तुम्ही सिनेमा दाखवाच'. त्यानंतर एके दिवशी ते जनाब अकस्मात खुषीत येऊन म्हणाले, पेठे आज मी पिक्चर दाखवतो. कुळकर्णी राजंदेरकर वगैरेनाही बोलवा. मी मनात म्हटले आज कुठले हे भाग्य फळफळले? सिनेमा रात्री नऊचा होता. थंडीचे दिवस असल्याने आम्ही सर्वजण गरम सूट, त्यावर चेस्टर व डोक्याला फेल्ट अशा थाटात निघालो. एकंदर चार पांच जण होतो. सिनेमा हॉलपाशी आल्यावर, जरा वेळ होता म्हणून गप्पा मारीत पान खात उभे राहिलो.

थोड्या वेळाने आत जाण्यासाठी नेहेमीच्या संवयीप्रमाणे फर्स्ट क्लासच्या दरवाजाकडे वळलो, तोच आमचे ते दोस्त (आमचे यजमान – चित्रपटापुरते) म्हणाले, 'अहो इकडे या'. आम्ही त्यांचे मागोमाग चालू लागलो–मुकाटपणे! तो हे गृहस्थ आपल्या पड्यालगतच्या पहिल्याच दरवाजाजवळ उभे राहून द्वारपालास तिकिटे देत होते. तो नऊ आण्याचा क्लास होता. त्याला पहिला म्हणा वा शेवटचा–आपल्या भोगण्यावरच ठरवावयाचे! आम्ही कोणीही कधीही त्या क्लासमध्ये बसलो नव्हतो. मुका-








ट्याने एकमेकांकडे पहात, गालातल्या गालात मिस्किलपणे हंसत हंसत आत शिरलो. कोणी ओळखीचे दिसते काय याचा अंदाज इकडे तिकडे अतिशय चौकस नजरेने घेतला. कोणी आम्हाला सहजासहजी ओळखू नये म्हणून चेस्टरच्या कॉलरी वर चढविल्या. फेल्ट डोळ्यावर ओढली. पडद्याजवळच्या दोन तीन रांगा सोडून अगदी गपचुपपणे जाऊन बसलो. सिनेमा पहाताना मनात त्या महान दोस्ताला शिव्यांची लाखोली वाहत होतो. कारण वांझ म्हैस फळली होती नि आम्हाला खर्वस मिळाला होता ना ? आम्हाला कोणी पाहिले वा ओळखले नाही, अशी गाजरे खात आम्ही आपापल्या घरी पोहोचलो.

दुसरे दिवशी मित्रवर्य कुळकर्णी प्रेसमध्ये काम करीत होते. त्यांचा मुसलमान जॉबर काही कामाने त्यांचेकडे आला. तो विषय आटोपल्यावर त्याने विचारले, 'साहेब कालचे पिक्चर तुम्हाला आवडले?' चाचाचे ते शब्द ऐकून साहेबांच्या चेहेऱ्यावरचे भाव पहाण्यास आमच्यापैकी कोणी तेथे नव्हता म्हणून ठीक! . . . मग त्या दोस्ताला पुन्हा सिनेमा दाखव म्हणण्याची आमची कोणाचीही छाती झाली नाही.

## चिरसंगीतात विलीन..:

१९३१ साल. महिना ऑगस्ट. तारीख २३. . . बहुधा रविवार असावा. मी त्यावेळी लाहोरला संगीत विद्यालय चालवीत होतो.

विद्यालयापासून सायकलसवार होऊन मी श्री. मोडक यांच्या घरी नेहेमीप्रमाणे मित्रमंडळींच्या अड्ड्यात जाऊन दाखल झालो. तेथे पांच सहाजण एकदम चुप्प बसलेले पाहून आश्चर्यच वाटले. कारण मला पाहिल्याबरोबर हंसतमुखाने स्वागत करणारी मंडळी चुप कां? काहीच समजेना. मी मनात समजलो की काहीतरी गंभीर प्रकार असावा. म्हणून मी सुद्धा सर्वांना चुपचाप नमस्कार करून एका खुर्चीवर गंभीर चेहरा करूनच बसलो, व मित्रांच्या तोंडूनच काय बाहेर पडते, त्याची वाट पाहू लागलो.

जरा वेळ कोणीच काही बोलेना—त्यामुळे जीव आणखीनच छटपटू लागला. थोड्या वेळाने एक मित्र मला उद्देशून विचारू लागला, "तुम्हाला आजच कळले की काय?"

प्रश्न चमत्कारिक होता. मी मानेनेच होय असा जबाब दिला. "तुम्हाला केव्हा कळले?" मी लगेच उलट प्रश्न टाकला. तेव्हा ते म्हणाले, "आजच्याच 'ट्रिब्यून'मध्ये आले आहे." इतक्यात दुसरे मित्र म्हणाले, "अहो परवा एकवीस तारखेलाच तर वारले. तेव्हा आजच्याच पेपरमध्ये येणार."

मी एकदम चरकलोच. कोण वारले याचा बोध होईना. माझी शोधक दृष्टी जवळपास कोठे "ट्रिब्यून" आहे का, ते बघू लागली. इतक्यात एक मित्र म्हणाले, "त्याना मिरजेलाच शेवटी घेऊन गेले, व तेथेच विचारे गेले. त्या 'मिरज' शब्दानेच मी चपापलो. डोक्यात लख्ख प्रकाश पडला.

नाशिक येथे गुरुजी बरेच दिवसांपासून आजारी होते. त्याना तर मिरजेला नेले नव्हते ना, हो शंका यावयास व "ट्रिब्यून" दिसावयास एकच गांठ पडली. मी एकदम उठून त्यावर झडप घातली, व पाने चाळू लागलो. तोच एके ठिकाणी लहानशी बातमी आढळली . . . . गुरुजींचा मिरज मुक्कामी २१ तारखेला स्वर्गवास झाल्याचे ते वृत्त होते.... मग मात्र मी चुळबूळ करतच थोडा वेळ कसातरी काढला व सायकलवर टांग मारून विद्यालय गाठले. कारण तेथील विद्यार्थ्यांना याबद्दल काहीच माहिती नव्हती.

खरे तर त्या दिवशी मालपोवा व भजी करण्याचा कार्यक्रम सकाळीच ठरला होता. त्याप्रमाणे आमचे हरिदासजी तसेच एक जुना विद्यार्थी व नोकराने मिळून सर्व सैंपाक करून ठेवला होता. मी जाऊन ह्याना गुरुजींच्या निधनाची बातमी सांगताच सर्वांचेच चेहेरे उतरले. बराच वेळ निस्तब्धता होती. शेवटी हरिदास म्हणाले, योग असतो तो असा. गुरुजींनी जिवंतपणी सर्वांना चांगले गोडधोड खाऊ घातलेच. पण स्वर्गाला गेल्यावर सुद्धा शिष्यांनी गोड खावे, अशीच त्यांची इच्छा दिसते. नाहीतर आजच आम्हाला तरी गोड करण्याची इच्छा कां व्हावी?

इतक्यात एक ओळखीचे ब्राह्मण आले. त्याना आग्रह करून आम्ही जेवावयास घातले; व दक्षणाही दिली. कसली म्हणून विचारता काहीच बोललो नाही. व दुःखित मनाने गोड अन्न घशात ढकलले.

मंगळवारी पं. धुंडिराज पंतांचे पत्र आले. व गुरुजी २१ ऑगस्टला स्वर्गवासी झाल्याचे समजले.

[क्रमशः]

[पृष्ठ ४६ वरून—समांतर रेषा]

चिकट गोंद नुसता. दूर सारावा तो आणखीनच लळतलोंबत चिकटणारा. शिसारी आणणारा. मस्तकात अशी ही तिडीक निर्माण झाली आहे पण ती त्याला आकळूच शकत नाही. दैवाची ही विपरीत तऱ्हा.

. . . . . अवचितपणे, अनपेक्षितपणे, दैवानंच शोधून दिलेला मार्ग.

निरव संध्याकाळ. प्रकाशाकडे पाठ फिरवणारी नि अंधाराच्या कुशीत लपणारी. वेगवान वारा नि सळसळती पानं. झाडांच्या दूरवर पसरलेल्या सावल्या—एकमेकात मिसळलेल्या, एकमेकात विरून गेलेल्या. एकमेकांच्या कुशीत स्थिर झालेल्या. त्या सळसळत्या पानाखाली सर्वस्व हरवल्यासारखा स्तब्ध उभा राहिलेला तो.

काही काळ निर्माण झालेली स्तब्धता—बेचैन करणारी. नि अचानक त्याचा जड झालेला स्वर.

"हे तुमचं पुस्तक."

"तुम्हाला कसं वाटलं? छान आहे नाही. ती 'प्रीतीखातर' गोष्ट मला फार फार आवडली."

आता आवडायचीच. पुरुषांना नादी लावणारी.

"मी जातो."

"कां हो, घाई कां? आत चला ना."

"नको मी जातो." धीमेपणाने आलेला स्वर.

"चला हो. आत जरा गप्पा मारत बसू." आर्जवी स्वर.

"नको."

"कां?"

"ते तुम्हाला माहीत आहे" धारदार आवाजात सुटलेले वेध घेते शब्द.

वेगानं, सरकन निघून गेलेला तो. नि त्याच्या पाठोपाठ सरकत जाणारी त्याची लांबच लांब काळी सावली.

. . . . ते तुम्हाला माहीत आहे? . . . हे असं कां होतं? एका ठराविक दिशेनेच जाणारी माणसं. दुसरा मार्गच नाही? तेच ते ठराविक संकेत, तीच ती भाषा नि तोच तो समारोप. अनेक पाऊलवाटानी शेवटी त्याच समारोपापाशी पोचायचं. ह्या पलिकडे मुळी काही नाहीच. साधी मैत्री असूच शकत नाही कां?

—— स्वर आतल्या आत दुखरा होऊन घुमतो आहे. त्याचे उमटणारे प्रतिध्वनी विलक्षण बेचैन करीत आहेत.

●●●

# विश्वकीर्त–सत्यजित रे

**बंगालचा** एक सुपुत्र, बंगाली चित्रांचा निर्माता, दिग्दर्शक असा सत्यजित रे आता एका मोठ्या सन्मानाचा धनी झाला आहे. १९५७ साली मध्य फिलिपाइन्स-मध्ये एका विमान अपघातात मृत्युमुखी पडलेल्या अध्यक्ष रेमन मॅगत्से यांच्या स्मरणार्थ मॅगत्से फाऊंडेशनतर्फे प्रतिवर्षी नामवंत आशियाई माणसांना एक पारितोषिक दिले जाते. त्याला 'मॅगत्से अॅवॉर्ड' म्हणून म्हटले जाते. १९६७ सालचे हे पारितोषिक यंदा आपल्या चित्रपटाद्वारे भारताच्या थोर परंपरेचे यथातथ्य चित्रण करणारा चित्रनिर्माता – दिग्दर्शक म्हणून सत्यजित रे यांना देण्यात आले आहे. हे पारितोषिक 'वृत्तपत्र व्यवसाय व साहित्य' विषयासाठी राखून ठेवण्यात आले होते. ह्या पारितोषिकासाठी निवड झालेले सत्यजित हे यंदाचे दुसरे मानकरी होत. ह्यापूर्वी यंदाचे हे पारितोषिक उत्तम शासकीय कामगिरीबद्दल लाओसचे एक अधिकारी कू व्हिपाकॉन यांना देण्यात आले होते. ह्या पारितोषिकात १०००० अमेरिकन डॉलर्स ( रु. ७५,०००|– ) एक सुवर्णपदक व एक प्रमाणपत्र यांचा समावेश होतो. चित्रपट व्यवसायात अशा तऱ्हेचे पारितोषिक मिळविणारे सत्यजित रे हे पहिलेच भारतीय निर्माते आहेत. ह्या त्यांच्या यशाबद्दल सर्वच भारतीयांनी त्यांचे अभिनंदन करावे अशी ही घटना आहे. सत्य-जित रे ह्यांनी अशा प्रकारची पारितोषिके व प्रमाणपत्रे काही प्रथमच संपादन केलेली नाहीत. किंबहुना जागतिक चित्रपट-सृष्टीत आपल्या ज्या काही चित्रनिर्मात्यांचा – दिग्दर्शकांचा दब-दवा आहे त्यांत सत्यजित रे ह्यांचा अग्रक्रम मानावा लागेल. त्यांच्या चित्र निर्मितीबद्दल अनेक विवाद आहेत हे मान्य करूनही ते प्रत्येक वेळी काहीतरी नवे–आशयघन करून जातात ह्याविषयी कुणाच्याही मनात संदेह नाही.

बंगालच्या भूमीशी, बंगालच्या साहित्य–कला परंपरेशी, बंगाली जीवन पद्धतीशी, बंगाली माणसाच्या मनोव्यापारांशी आणि सर्वाधिक बंगाली भाषेशी सत्यजित रे हे पतिव्रतेच्या निष्ठेने वागत आहेत. ह्यातली कडवी पति-निष्ठा काहींना पसंत नाही. पण सत्यजित तेथे अढळपणे उभे राहिले आहेत. टीकेचा परिणाम न करून घेण्याइतके त्यांचे मन निश्चल राहिले आहे. यशाचा कैफ त्यांना नाही तसेच आपल्या भूमिकेबद्दलचे विकल्पही नाहीत. हे अॅवॉर्ड त्याना मिळाले तेव्हा एका पत्र प्रतिनिधीने विचारले की, "हे अॅवॉर्ड मिळाल्यामुळे तुमच्या हालअपेष्टांशी झगडणाऱ्या व दुर्दैवाचे फेरे पाहणाऱ्या मानवतेच्या चित्रणाला आता अधिक प्रेरणा मिळेल नाही?" त्यावर सत्यजित रे ह्यांनी जे उत्तर दिले आहे ते मनोज्ञ आहे. ते म्हणतात, "कष्ट हालात पिचलेली माणसे हा माझा फार जिव्हाळ्याचा विषय आहे ह्या-बद्दल वाद नाही. पण कलावंत म्हणून त्याच त्या विषयाची पुनरा-वृत्ती प्रत्येक वेळी करीत राहणे मला उचित वाटत नाही. म्हणून विविध प्रकारची माणसे माझ्या चित्रपटात येतील. त्यातून




काही नवे जीवनदर्शन घडेल. मानवी यातनांतल्याही पैकी विविध यातनांवर चित्रपट काढणेही मला अजून आवडेल. यापुढे मी विविध विषयांवर चित्रपट काढणार आहे. विविध मानवी भावना, मानवी सुख दुःखे ह्यांचे चित्रण मला करायचे आहे. माझ्या चौदाही चित्रपटांतली माणसे तशी सामान्य माणसे असूनही ती अ-सामान्य होती असेच आढळून येईल. त्यांचे आगळेपण ध्यानी येईल."

सत्यजित रे यांच्या ह्या उद्गारात सार्थ अभिमान व नम्रताही दिसते. सत्यजित रे यांनी निर्माण केलेल्या चित्रात खालील चित्रांचा समावेश होतोः पथेर पांचाली (१९५५) अपराजितो (१९५६) परस पथर (१९५७) जलसागर (१९५८) अपुर सन्सार (१९५९) देवी (१९६०) रविन्द्रनाथ टागोर (१९६१) तीन कन्या (१९६१) कांचनगंगा (१९६२) अभिजात (१९६२) महानगर (१९६३) चारुलता (१९६४) कापुरुष ओ महा-पुरुष (१९६५) नायक (१९६६) यातल्या – पथेर पांचाली अपराजित आणि अपुर संसार ह्या तीन चित्रातून एकच जीवन-कथा (अपूची) सांगण्याचा प्रयत्न सत्यजित रे यांनी केला आहे. तर 'चारुलता'ची कथा 'टागोरांच्या विस्कटलेले घरटे' ह्या प्रसिद्ध कादंबरीवरून घेतलेली आहे. बिभूती भूषणसारखा गाजलेला लेखक सत्यजितचे दैवत बनला आहे. 'त्याच्या कथातून ग्रामीण बंगाल माझ्या डोळ्यापुढे नाचू लागतो व मग बनतो चित्रपट' असे सत्यजित रे सांगतात. सत्यजित रे यांना नव्या कल्पनांचे वेड आहे. हेच त्यांच्यातल्या गतिशीलतेचे प्रमुख लक्षण मानावे लागेल. ते एके ठिकाणी म्हणतात की "मला त्याच त्या कल्पनांचे चित्रपट एकापाठोपाठ काढण्याची कल्पना पसंत नाही. मला अजून काही विषय हाताळायचे आहेत. मला एक 'एपिक' चित्र काढा-यचे आहे. ऐतिहासिक, शास्त्रीय कादंबरीवरील चित्र काढायचे आहे. उमेद आहे. पण हवा तसा पाठिंबा अजून मिळत नाही. कथा आणि शैलीच्या दृष्टीने सतत प्रयोग करीत राहणे मला आवडते." सत्यजित रे ह्यांनी भारतीय चित्रसृष्टीला 'कथा' दिल्या. 'अमर' अनुभव दिले. सखोल विचार दिला. उत्तम व कलात्म चित्रण दिले (पसारा नाही) व काही स्मरणीय 'व्यक्तिरेखा' दिल्या. मातीशी इमान राखले व शिकविले. हिंदी–मराठी निर्मात्यांना 'मसाला' लागतो. कुठलाही तसा मसाला न वापरता सत्यजित रे

आज जागतिक कीर्तीचा मानकरी झाले आहेत. इमानाला मान मिळू शकतो. मानधनाला धन मिळते हेच ह्या निमित्ताने सिद्ध झाले आहे.

सत्यजित रे यांचे अभिनंदन !!

## (विजया) राणीने घडवले 'राज्य'—

ग्वाल्हेरच्या राजमाता विजया राजे शिंदे ह्यांनी आज नवा इतिहास घडविला आहे. आणि राजे राण्या ह्या नव्या लोकशाहीत पत्त्यातल्याच केवळ राहिल्या नाहीत हे सिद्ध केले आहे. भारतीय लोकशाहीचे अधिकार तर साऱ्यांना द्यायचे आणि शासनानुकूल पद्धतीने त्यांचा वापर केला तर टाळ्या पिटायच्या, एऱ्ही त्या वापर करणारांवर सूडबुद्धीने दात धरायचा. त्यांना 'वनवासी' करण्याची भाषा करायची अशी एक 'सरकारी' लोकशाही ह्या देशात नांदू पहात होती. (अजूनही काही प्रांतातून ती नांदते आहेच.) त्या लोकशाहीला आता नवी आव्हाने दिली जात आहेत. अशा तऱ्हेचे एक प्रभावी, धाडसी आव्हान एका स्त्रीने स्वीकारले आणि ते सिद्ध करून दाखविले. वास्तविक ही स्त्री मुळात कॉंग्रेसमधलीच. भारताच्या लोकसभेत गेली दहा वर्षे ती बसत होती. पण दिल्लीच्या व्यापक राजकारणात त्या स्त्रीने कमी वेळा तोंड उघडले असेल. त्याचा प्रभावही तिथे पडल्याचे ऐकिवात नाही. पण मध्यप्रदेशाच्या राजकारणात जसे मिश्राजींचे काहीसे हुकूमशाही थेर सुरू झाले. तेव्हा ह्या स्त्रीने प्रांताची उठाठेव करायचे ठरवले. आणि दोन निरनिराळी चिन्हे घेऊन ही स्त्री लोकसभा व विधानसभा निवडणुकीसाठी उभी राहिली. दोन्ही ठिकाणी कॉंग्रेसचा पूर्ण पराभव ह्या स्त्रीने केला. निर्णय घेतला—प्रांतीय राजकारण करण्याचा. संयुक्त विधायक दलाचे संचालन तिने पत्करले. यशस्वी करून दाखविले. मुख्यमंत्रीपदाची जागा नाकारून संघटनात्मक नेतृत्व करण्याचे त्यांचे पाऊल त्यांचे आगळेपण सिद्ध करून जाते. मदर इंडियाचे मुंबईकर संपादक बाबूराव पटेल ह्यांना निमंत्रण देऊन लोकसभेत पाठविण्याची कल्पनाही ह्याच स्त्रीची. प्रभावही तिचाच! अन्यथा मुंबई कुठे आणि मध्यप्रदेश कुठे? मिश्राजींच्या वैयक्तिक अहंकारामुळे ही स्त्री पेटली असली पाहिजे. ह्या प्रसंगात विशेष गाजल्या त्या राजमाताच! स्वाभिमानी व बाणेदार व्यक्तित्व, शालीन सौंदर्य, इंग्रजी–हिंदी भाषांवरील प्रभुत्व, पत्रकार परिषदेतला हजरजबाबीपणा व कौशल्य व सत्तेपासून पुन्हा अलिप्त राहणे ह्या गोष्टी विशेष उल्लेखनीय ! जन्म, बालपण, शिक्षण उत्तर भारतात झालेली ही स्त्री माहेरचा राजघराण्याचा वारसा न लाभलेली एका सनदी नोकराची मुलगी. आई नेपाळी. पण लग्नाने 'मराठी' तेजस्वितेशी तिचा संबंध आला. शिंद्यांचा ऐतिहासिक वारसा मोठा. तो 'नव्या' स्वराज्यात काही वेगळ्याच पद्धतीने प्रगट झाला आहे. तुफानी पैसा खर्चून खेचून आणलेली विजयश्री मिश्राजींना ओकायला लावणारी ही तेजस्वी स्त्री आज अनेकांच्या चर्चेचा वा कुतूहलाचा विषय बनली आहे. शासकीय तनख्यांच्या निमित्ताने संस्थानी (गंजलेल्या) तलवारींना नवी धार येत चालली आहे. विजयाराजे शिंदे, गायत्री देवी, तारकेश्वरी सिन्हा ह्यांच्या सारख्या स्त्रिया आता 'लोकशाही' राजकारणात आपला 'उपद्रव' वाटण्याइतपत प्रभाव पाडू लागल्या आहेत हे मनूच्या देशातले एक सुचिन्ह मानावे काय? मानावे असे मला वाटते.

## एक 'मनस्वी' मऱ्हाठा

आचार्य प्रल्हाद केशव अत्रे, आचार्य अत्रे, नाटककार अत्रे, पटकथा लेखक, विनोदाचार्य, कवि केशवकुमार, नाट्य-चित्र दिग्दर्शक, वक्ते–विद्वान, झुंजार जागल्या वगैरे बिरुदांनी भूषवूनही आचार्य अत्रे यांचे यथार्थ वर्णन केल्याचे समाधान मिळतेच असे नाही. काही तरी उरतेच आणि जे उरते तेही येवढे मोठे असते की तेही गोंधळात पाडते. मग पुन्हा बिरुदे, विशेषणे स्मरतात आणि अखेर मनात उत्तर मिळते 'नेति' नेति !! आचार्य अत्रे हा माणूस अजूनही 'ताजातवाना' आहे. अगदी 'फ्रेश' आहे त्याची प्रज्ञा अजूनही काही नवे 'चमत्कार' घडवून जातेच आहे. उमेद सरली नाही. उत्साह ओसरला नाही. आशा खचल्या नाहीत. डोंगराएवढ्या अडचणी पचवून, लोकप्रियता आणि लोकनिंदा ह्या दोन्हीचा आत्यंतिक टोकाचा अनुभव घेऊन, हर्ष खेदाच्या अतीत असे काही मानसिक सामर्थ्य ह्या माणसाने प्रगट केले आहे. वृत्तीचा व हाडाचा हा 'मनस्वी' माणूस. अशी माणसे जे जिणे जगतात ते अति उत्कटतेने. ते जीवन महिन्यांनी–वर्षांनी अशी जगतच नाहीत. ती जगत असतात काही क्षण. ही प्रतिभेची बाळे क्षणाक्षणाला 'नवता' देत असतात. 'नवता' घेत असतात. आचार्य अत्रे सत्तर वर्षांचे झाले हे गणित तुम्हा आम्हा जनसामान्यांच्या लौकिक गणिताप्रमाणे. एऱ्ही प्रतिभेच्या, प्रज्ञेच्या गणितातला हा माणूस 'अजून यौवनात मी' असेच म्हणत असलेला आढळेल.

आचार्य प्रल्हाद केशव अत्रे ही एक व्यक्ति नाही ती आहे आता एक शक्ति ! त्या शक्तीच्या मागे आहे साधना. तपश्चर्या. अफाट परिश्रम – वाचन – मनन – चिंतनही ! हे सारे घडले आहे त्यांच्या 'मनस्वी' स्वभावातून. कधी कधी अत्रे हे एक कोडे वाटले. त्यांच्या वागण्यात विसंगति वाटली पण त्यांचा शोध त्यांच्या वृत्तीतच घेतला पाहिजे. "अशी सुंदर वस्तु आम्ही त्रिभुवनात पाहिली नाही." अशासारखे आत्रेय शेरे आता लोकांच्या मनी-मानसी ठसले आहेत. पण ते खोटेपणातून येत नाहीत–मनस्वितेतून येतात. जे जे सुंदर - चांगले दिसते त्याने हा 'मनस्वी' माणूस भारावून जातो. त्यांच्यातला 'कवि' जिवंत आहे. 'रसिक' जागा आहे. वय–अभ्यास–चिंतन–अनुभव – जगप्रवास – विविध चळवळीतून घेतलेला 'मानवी' (व दानवीही) अनुभव- कौटुंबिक हर्षामर्षाचे प्रसंग – व्यावहारिक पडझड– ऊनपावसाचे प्रसंग ह्यातून अत्रे यांचे जीवन समृद्ध झाले आहे. महाराष्ट्राच्या गेल्या चाळीस पन्नास वर्षांच्या साहित्यिक, सामाजिक, राजकीय, नाट्यविषयक चळवळींचा इतिहास 'आचार्य अत्रे' ह्या नांवाशिवाय पूर्ण होणार नाही. 'झुंजार प्रचारक' हे अत्र्यांचे मोठे बिरुद ! ते ज्या ज्या पक्षाच्या देवडीवर जाऊन उभे राहिले, त्या त्या पक्षाला त्यांनी 'यश'च दिले. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यातली त्यांची कामगिरी हा कळस होता. पक्षीय राजकारणामुळे आचार्य अत्रे यांच्या अंगच्या कितीतरी गुणांचा महाराष्ट्राला 'ऐहिक' दृष्ट्या व्हावा तसा फायदा झाला नाही अशी खंत कधी कधी वाटून जाते.

जय पराजय पचवूनही हा हिमालय 'खडा' आहे. त्या हिमालयाला अभिवादन. "अजून यौवनात मी" असा 'जीवना'चा संदेश ज्याच्या जीवनातून स्रवतो त्या 'आत्रेय' वृत्तीला अभिवादन. सो साल जियो अत्रेजी ! सो साल जियो.

—आदित्य



अनुक्रमणिका






## "बालेकिल्ला ढासळला"

**स्वार्थ,** लाचलुचपत, वशिलेबाजी, जातीयवादी दृष्टि, इत्यादि इत्यादि जळवांनी पोखरलेले व वीस वर्षे तग धरून राहिलेले अनिर्बंध व सर्वंकष असे कॉंग्रेस शासन हळुहळू कोलमडून पडत आहे. ही पडझड मोठी प्रेक्षणीय, चिंतनीय अशीच आहे. ह्या पडझडीतही काही "पद्धत" आहे. त्यात 'स्वार्थ' आहेच. किंबहुना नंतर जी राज्ये कोलमडली त्यात जी "कॉंग्रेसी" मंडळी बाहेर पडली ती काही मोठी जनकल्याणाच्या उद्देशाने बाहेर पडली नाहीत. त्यात स्वार्थ दुखावलेला वैयक्तिक अहंकार, गटबाजी, जातीय विचार वगैरे प्रकार होतेच. ह्या साऱ्या प्रकारांचा त्यांना अगदी नव्यानेच जणु साक्षात्कार झाला. एरव्ही ही सारी माणसे मोठी धुवट चारित्र्याची वगैरे होती असा भ्रमही निर्माण करून घेण्याचे कारण नाही. 'सत्ता' हेच शेवटी त्यांचेही ध्येयस्वप्न होते. कॉंग्रेसी कळपात राहून ही सत्तेची ऊब साधत होती तोपर्यंत ही माणसे त्याच कळपात राहिली. पण वैयक्तिक अहंकार जेव्हा दुखावले गेले तेव्हा ही माणसे विचित्रांशी शय्यामैत्री करायला तयार झाली आहेत.

तात्पर्य — अनेक प्रांती आता संमिश्र सरकारे स्थापन झाली आहेत. कॉंग्रेसी अंतर्गत भांडणे आता चव्हाटचावर येऊ लागली आहेत. असेच एक मोठे भांडण एका मोठ्या राज्यात घडले. ह्या भांडणांची पद्धतही आता ठरून गेल्यासारखी आहे. त्याच पद्धतीने विरोधी पक्षांनी काही कॉंग्रेसी आमदारांना 'पळवले' व थेट 'दिल्ली दरबारी' पेश केले. मार्गात 'मिश्रा' मार्गाने काही अडथळे आले. पण सारे पोहचले (सुखरूप) पण दिल्ली दरबारच्या गळी हे 'भयानक सत्य' चटकन् उतरले नाही. इंदिराजीच्या आजच्या गादीचा एक शिल्पकारच कोसळतो म्हणजे काय ? संरक्षण घेतले (तेव्हा) मग आता त्याला 'संरक्षण' दिलेच पाहिजे ह्या कृतज्ञतेच्या भावनेने श्रीमति इंदिराजी वागल्या.



राजा बोले दळ आले पद्धतीने चव्हाणांनीही मुदतपूर्व निवडणुक, विधानसभा स्थगिती वगैरे प्रकारांबद्दल 'मम' म्हटले. मिश्राजींचा अहंकार तर फारच मोठा. लोकशाहीमध्ये खुर्चीवर जनतेने ठेवला तोपर्यंत मंत्री अन्यथा रस्त्यातला एक 'कॉमन मॅन' ही जनतेची शक्ति मिश्राजींना ठाऊक नाही असे नाही. पण अनेक मदांप्रमाणे "सत्तामद"ही भयानक असतो (वार्निशचा मद किती भयानक हे मद्रासेत नुकतेच कळले) माणूस 'अत्यवस्थ' होतो—मिश्राजीही तसे झाले. पण वाळू घसरली होती. हा डोलारा आपण सावरू शकत नाही हे शहाणपण कामराजांनी ओळखले आणि मिश्राजींना त्यांनी रजा घेण्यास सांगितले. जे अटळ होते. अपरिहार्य होते. आणि आवश्यकही होते ( अनिर्बंध सत्ता ही लोकशाहीचा घात करते म्हणून) ते अखेर घडले. हे अधिक 'ग्रेसफुली' व्हायला हवे होते. पण मिश्राजींचा तोल गेला. आजही तो सावरला गेलेला आहे, असे म्हणता येणार नाही (मुंबईतली मुलाखत वाचावी). ह्या सर्व प्रकरणात त्यांनी जे जे आरोप विरोधी पक्षांवर केले, ते ते सारे आरोप वस्तुतः त्यांच्यावर उलटणारे होते. त्यांनी सत्ता कायम राखण्यासाठी अखेरच्या क्षणी ज्या क्लृप्त्या केल्या त्याही एका अवाढव्य प्रांताच्या, किंग मेकर म्हणून गाजलेल्या मंत्र्याला शोभणाऱ्या नव्हत्या. उदाहरणार्थ, लोकसभेला सादर करण्यासाठी, ४००/५०० लोकांना ओव्हरटाइम देऊन त्यांनी नवे बजेट तयार करून घेतले. हेतु हा की विधानसभा विसर्जित करण्याच्या मुद्यावर ते आग्रही भूमिका घेणार आहेत ही भूमिका विरोधी दलाच्या ध्यानी यावी.




आउट ? पण क्रीज सोडवत नाही !!

# रसिकराज रामूभैया

कला नुसती फुलत नाही. बहरत नाही. कलेला 'दाद' लागते. 'साथ' लागते. सोबत लागते. ही दाद, साथ जाणकारीतली असली तर कला अधिक फुलते. बहरते. सजीव होते. अशी साथ देणारी, दाद देणारी दिलखुलास वृत्तीची, धुंदी घेणारी आणि धुंदी निछावर करणारी माणसे कलेच्या दरबारात शोभून दिसतात. ती स्वतः तर शोभतातच पण कलेची व कलावंताचीही शोभा वाढवितात.

असाच एक 'उन्मनी' माणूस अगदी अचानकपणे कलेच्या पटावरून उठून देवाघरी गेला. सदैव फुलतच राहिलेले एक हंसरे फूल गळून पडले. कलेची 'दाद' संपली, सुरांचा 'रववैया' मूक झाला. एक देखणे, कलासक्त व्यक्तित्व हरवले. त्या व्यक्तित्वाचे लौकिक नांव होते रामूभैया दाते ! कलेतले नांव होते रसिकराज रामूभैया ! महाराष्ट्राला ह्या रसिकराज दात्यांचा परिचय गेल्या काही वर्षातच झाला. पण माळव्यातल्या, विशेषतः इंदूरच्या परिसरातल्या- सुरवेड्या दुनियेला रामूभैया ही व्यक्ति ही व्यक्ति कधी वाटलीच नाही. ती त्यांना नेहमी शक्ति म्हणूनच वाटली. त्यांनी तिला तसेच पाहिले आणि तसेच मानले. काही माणसे लौकिक 'जन्म' घेतात. 'लौकिक' सामान्य, बरे वा उत्तम जिणेही जगतात. पण त्यांच्या व्यक्तित्वाचे पालन पोषण होते ते मात्र काहीतरी अलौकिकाच्याच साथ सोबतीने! रामूभैया दाते ही व्यक्ति अशीच होती. रामूभैया हे न्यायालयाच्या कामात जितके रमत त्यापेक्षा ते गाण्याच्या मैफलीत, गवयांच्या बिऱ्हाडी, सुरांच्या व वाद्यांच्या सहवासात अधिक रमत. सौंदर्याने मोहून जाणे आणि शिर नमवून दिलखुलासपणे 'दाद' देणे हा रामूभैयांचा विशेष होता. सौंदर्य सर्वत्र असते. पहाणारी दृष्टि हवी. ती दृष्टि रामूभैयांच्या मध्ये होती. म्हणूनच सुरांच्या (आणि शेरांच्या) संगतीत आयुष्याचे चढउतार पाहताना रामूभैयांच्या चेहऱ्यावरची निरागसता नाहीशी झाली नाही. रामूभैयाची परिभाषा हीही सुरांचीच असे. गाण्यासंबंधी बोलणे आणि बोलण्यासाठी सुद्धा सुरावटीचाच छंद घेणे हे रामूभैयांचे वैशिष्टय. रामूभैयाची रसिकता उथळ नव्हती. ते नेहमी भारावलेले असत. पण त्यांचे तत्वज्ञान रुक्ष नव्हते. मैफल रुक्ष नव्हती. मोठेपण जाणणे आणि मान वाकवून दाद देणे हा त्यांचा धर्म होता. तो 'धर्म' पाळताना त्यांनी कधी कंजुषी केली नाही. जाणकार रसिकताही कसे मानाचे मुजरे मिळविते ह्याची एक फार रंजक आठवण पु. ल. देशपांड्यांनी आपल्या लेखात दिली आहे. रामूभैयांचा पाय मोडला होता. प्लॅस्टरमध्ये तो घातला होता. त्या काळातली गोष्ट. ते म्हणतात की बेगम अख्तर रेडियोत गाण्यासाठी इंदूरला गेल्या होत्या तेव्हा त्यांनी येताच रामूभैयांची चौकशी केली. त्यांच्या प्रकृतीची हालत कळताच पत्ता (नव्या घराचा) शोधीत त्या घरी गेल्या व पलंगाच्या पायथ्याशीच त्यांनी मैफल पेश केली. कारण का तर दातेसाहेबांना रेडिओ संगीत संमेलनाला येता येणार नव्हते. त्यानंतर अनेक गायक-गायिकांनी तेथे 'हजेरी' लावली असं देशपांडे म्हणतात.

रामूभैया स्वर-समृद्ध जीवन जगले. पण आसक्ति नव्हती. ते म्हणत "परमेश्वराचं घर हे माणसाचं माहेर आहे. मग तिथे जाण्यात दुःख कसलं ? आपण खेळायला जातो. परत येतो" आयुष्य ही क्रीडा मानणारा हा माणूस खेळायला निघून गेला आहे. सौंदर्यवादी तांबे म्हणत 'पोषाख मज दिला नवा नवा'. रसिकराज रामूभैय्या जीवनाची नवी 'रंगपंचमी' खेळण्यासाठी तर नवा पोषाख आणायला देवाघरी गेले नसतील ?

रामूभैयांच्या रसिकतेला ही आमची 'दाद'च ।

—संपादक

राज्यपाल के. सी. रेड्डी हे 'पक्षीय' उंचीपेक्षा वेगळे वागले नाहीत. 'काँग्रेसी आमदारांना पळवले' हा मिश्राजींनी आरोप करताच तीच मंडळी उठली व उलट मिश्राजींपासूनच धोका संभवतो म्हणून आम्ही आमदार निवासात जाऊ शकत नाही असे जाहीर केले. बदललेल्या भावना घ्यानी घेऊन राज्यपालांनी त्यांना आपल्या बंगल्यावर त्या रात्री 'संरक्षण' दिले आणि मग ते 'ऐतिहासिक' मतदान घडले. मिश्रा राजवट संपली. प्रवीरचंद्र भंजदेवच्या वस्तार प्रकरणात सर्वाधिक बदनाम झालेल्या हुकूमशहाची राजवट संपुष्टात आली. मिश्रा हे तसे जुने, मुरलेले (अशा राजकारणातले) पटु गृहस्थ. खरे-हसीना प्रकरणी गाजलेले. पण 'लोकशाही' ही काही वैयक्तिक 'हसीना' नव्हे हे न ओळखलेले मिश्रा अखेर अस्तंगत झाले. केंद्र शासनाचा एक मोठा बालेकिल्ला ढासळला आहे. मिश्रांचे पतन हा केंद्रशासनाला फार मोठा इशारा आहे. सत्तेसाठी अंध झालेल्या चंद्रभानु गुप्ता ह्यांनी यु. पी-मध्ये नुकताच पुन्हा तडाखा खाल्ला. तरीही ही माणसे पुन्हा पुन्हा तेच राजकारण करीत आहेत. जनसेवेसाठी शासन ही भूमिका संपली आहे. म्हणूनच आज सर्वत्र अविश्वासाचे वातावरण दिसते आहे. ब्रिटिशांप्रमाणेच 'यावच्चंद्र दिवाकरौ'ची स्वप्ने पाहणाऱ्या सत्तापटूंना अखेर जनतेने 'चलेजाव'चा आदेश आणि तोही अवघ्या वीसच वर्षांत द्यावा हे दृश्य मोठे केविलवाणे आहे. चिंतनीय आहे.

## "नऊ ऑगस्ट" आणि नन्तर....

९ ऑगस्ट १९४२ ह्या दिवसाला आधुनिक भारताच्या स्वातंत्र्य लढ्याच्या इतिहासात एक अनन्यसाधारण स्थान आहे. प्रत्येक दिवसाचे वा घटनेचे महत्व हे 'यशस्वी' वा 'अयशस्वी' (तात्कालिक) ह्या एकाच ढोबळ शब्दाने कमी वा जास्त लेखणे हेच ज्याचे ब्रीद अशांना कदाचित त्या दिवसाचे महत्व कमी वाटणे शक्य आहे. पण अशा दिवसांचे वा अशा






घटनांचे महत्व हे तात्कालिक यशापयशावर मोजले जावे असे नाही. १८१८ ला आपण परतंत्र झालो. १९४७ ला आपण परदास्यातून मुक्त झालो. ह्या काळात, ह्या देशात १८५७ च्या स्वातंत्र्यसमराच्या अयशस्वी प्रयत्नापासून अनेक लहान मोठे क्रांति-प्रयत्न झाले. काहीच्या भाळी तर प्रसिद्धीचे भाग्यही लाभले नाही. काही प्रयत्न त्रिखंडात गाजले. पण ह्या साऱ्या लहान-मोठ्या, यशस्वी-अयशस्वी (लौकिक दृष्टचा अयशस्वीचे) उठावातूनच १५ ऑगस्ट १९४७ ह्या दिवसाची निर्मिती शक्य झाली ही गोष्ट आपण कृतज्ञतापूर्वक स्मरली पाहिजे. ९ ऑगस्ट १९४२ ह्या दिवशी "भारत छोडो"चा आदेश गांधीजींच्या मुखाने देशाने ब्रिटिश सत्तेला दिला. तो आदेश देणारे गांधीजी व तत्कालीन देशनेते ह्यांना अटक झाली. त्यानंतर हिंसात्मक तर कधी अहिंसात्मक अशा मार्गाने ही चळवळ चालली व अवघ्या काही महिन्यात ती थंडावली. ह्या चळवळीच्या यशापयशाबद्दल, तिच्या गतिप्रगतीबद्दल त्या चळवळीचे धुरिणत्व करणाऱ्या अरुणा असफअल्ली, अच्युतराव पटवर्धन आदि मंडळींनी नुकतीच चिकित्सा केली आहे (किर्लोस्कर, ऑगस्ट ६७) ती मुळातच वाचण्यासारखी आहे. चळवळी झाल्या. पण प्रत्येक चळवळीचे असे मार्मिक मूल्यमापन होणे, भावनेपेक्षा वैचारिक पातळीवरून ते होणे फार अगत्याचे असते. १९४२ च्या चळवळीचा आवाका मोठा होता. पण योजनाशून्यता, नेतृत्वशून्यता, निश्चित कल्पनांचा अभाव व जनसामान्याच्या भावजीवनाशी 'करेंगे या मरेंगे' ही भावना न पोहचणे हे काही दोष त्यानीही मान्य केले आहेत. ती चळवळ एकदम यशस्वी झाली व आदेश ऐकून साहेब इथून निघून गेला असे घडले नाही. पण अशी प्रत्येक चळवळ देशातील जनतेचा आत्मविश्वास वाढवीत गेली हे नाकारता येणार नाही. चाफेकर बंधूनी फास वरले म्हणून सावरकर, धिंग्रा, खुदीराम बोस ही माणसे उभी राहिली. आणि ती उभी राहिली म्हणून 'भारत छोडो' हा आदेश देणारी व्यापक देशभावनाही उभी राहिली. ९ ऑगस्ट १९४२ ही तिथी त्या दृष्टीने मला महत्त्वाची वाटते. हिंसा–अहिंसेचा भारतीय मनातला गोंधळही त्या निमित्ताने निघून गेला असे म्हणता येईल. भूमिगत आंदोलन हा त्या लढ्याचाच एक गौरवपूर्ण भाग होता. त्यातली जयप्रकाश–अरुणा, अच्युत-अशोक ही माणसे आजही नेतृत्वपदी आहेत. प्रमाण कमी-अधिक होतच असते. पण प्रवाह सुटला नाही.

९ ऑगस्ट १९४२ चा पंचवीसावा स्मृतिदिन आपण मोठ्या अभिमानाने साजरा केला. योग्य केले. पण ते करताना छोडो भारत असे एकमुखाने, एकदिलाने ब्रिटिशांना सांगणारा एकात्म भारत, एकसंध भारत राखण्यात, त्याला सुख समृद्धि मिळवून देण्याच्या अंगिकृत कार्यात आम्ही कितपत यशस्वी झालो आहोत ह्याचा विचार होणेही अगत्याचे आहे. ९ ऑगस्टला दिल्लीपासून गल्लीपर्यंत झालेली भाषणे ऐकली. (काही रेडियोवर, काही प्रत्यक्ष) त्यातली काही भाषणे केवळ 'उपचार' म्हणून, फड जिंकण्यासाठी केलेली होती. त्याग, तपस्या, बलिदानाच्या मार्गावरच्या काही पथिकांचीही भाषणे त्यात होती. ही भाषणे ती 'स्मृति' जगविण्यासाठीच प्रामुख्याने झाली. तो इतिहास डोळ्यांनी पाहिलेली पिढी आज हयात आहे. तो नवा नाही. नवे हवे ते विश्लेषण ! स्वतंत्र भारत हे ९ ऑगस्टचे स्वप्न होते. समृद्ध भारत ही त्या दिवसाची प्रतिज्ञा होती. 'करेंगे या मरेंगे' ह्या आदेशाने तो दिवस सुरू झाला. पण ते स्वप्न साकारले असले तरी प्रतिज्ञा अपूर्ण राहिली आहे. 'छोडो भारत'-वरून आम्ही ब्रिटिशांशी जेवढ्या हिरीरीने भांडलो त्यापेक्षा अधिक हिरीरीने आम्ही गांवासाठी, नदीच्या पाण्यासाठी, भाषेसाठी, (ते सुद्धा इंग्रजांच्या) भांडतो आहोत ही वस्तुस्थिति आहे. "भाषिक राज्ये" ही सोय होती. आज ती 'अग्नि' होऊ पहात आहेत. (उडियांवर हल्ला–ताजी 'बंगाली' मिठाई) अखेर आम्ही ब्रिटिशांना नेमके घालवले कशासाठी ? अच्युतराव पटवर्धन–अरुणाबाईंनी फार स्पष्टपणे–पण तळमळीने काही विचार मांडले आहेत. विघटनकारी शक्तींचाच प्रभाव आज वाढतो आहे. आमच्यात ऐक्यभावना जागृत होतांना दिसते ती फक्त चीन-पाक हल्ल्यांच्या वेळी-काहीशी 'उत्सवी' स्वरूपाची. एरव्ही आम्ही आपापसातच झगडत राहतो हे (दुर्दैवी) सत्य आहे. इतिहासाची पाने आम्ही वाचतो. ती खंडात्मक स्वरुपात प्रसिद्धही करतो (समारंभपूर्वक) पण भारताचा सारा इतिहास हा आपापसात लढून वाया घालविलेला इतिहास आहे हे सत्य-आम्ही अजूनही समजू शकलो नाही. नेफा लडाख पूर्व पाकने गिळंकृत केलेल्या भागाबद्दल आम्हाला जेवढी खंत वाटायला हवी त्यापेक्षा अधिक खंत इतरत्रच जास्त वाटते. मग एखादा आमदार उठतो आणि "भारत पाक युद्धातल्यापेक्षाही बेळगावला अधिक सैन्य आणावे लागेल" अशी घोषणा खुद्द विधानसभेतच करतो. (आणि तरीही तो "आमदार" राहतो. "दे. भ." म्हणून मिरवतो) ९ ऑगस्ट १९४२ च्या स्मृतीचे निमित्ताने आपण परखड कठोर आत्मपरीक्षण केले पाहिजे. भावनात्मक आवाहनाने आंदोलने उभी करता आली तरी समस्या सुटण्याला मदत होतेच असे नाही. What we learn from History is that we learn nothing from History असे शॉ म्हणतो. आम्ही ते खोटे ठरविणार आहोत काय ? पंचवीस वर्षानंतर (वयात आल्यावर) इतपत आत्मपरीक्षण हवेच, नाही का ? हुतात्म्यांच्या पवित्र स्मृतीला अभिवादन ! !

**—सारस्वत**





अनुक्रमणिका







# इंद्रधनुष्य

## चित्रकार हुसेन यांचा राजस्थानवरील अनुबोधपट

**मुंबई** महाराष्ट्राची अशी गर्जना करणाऱ्या मराठी–भाविक मुंबईकरालासुद्धा या अवाढव्य शहराच्या सांस्कृतिक जीवनाचा एक बराचसा मोठा भाग अपरिचित असतो. त्याला काळजी असते मुंबई नभोवाणी 'ब' वर मराठीतूनच कार्यक्रम होतात की नाही याची! तो गर्दी करतो मराठी नाटकांना (अन् लहर लागलीच तर एखाद दुसऱ्या, नशिबवान् मराठी चित्रपटाला)! निव्वळ मराठी दैनिकांतील सदरे बघून तो काय पाहायचे नि काय ऐकायचे ते ठरवितो !

पण गेल्या काही वर्षांत या निर्भेळ मऱ्हाटीपणाच्या पलिकडे पसरलेल्या एका प्रचंड सांस्कृतिक चळवळीचे पडसाद मराठी-भाषिकांच्या कानी उमटू लागले आहेत. जुलै-ऑगस्ट महिन्यात कधी नव्हता इतका पाऊस या मुंबापुरीत पडला, अन् तरी या चळवळीचा जोष कमी झाला नाही; विविध, ढंगदार कार्यक्रम होतच राहिले.

आपल्या कलावंतांपैकी काहींच्या कपाळी असे लिहिलेले असते की परदेशात त्याना कीर्ति मिळाली तरच त्यांच्या नांवाने इथे ढोल ताशे वाजायचे ! मकबूल फिदा हुसेन या गाजलेल्या चित्रकाराची एका बाबतीत अशीच स्थिती झाली ! आपल्या आयुष्यात प्रथमच हुसेन यानी कुंचला बाजूला ठेवून एक छोटासा चित्रपट तयार केला. फिल्म्स डिव्हिजन या सरकारी अनुबोधपट निर्माण करणाऱ्या संस्थेने त्यांना विनाशर्त सक्रीय पाठिंबा दिला. कॅमेरा घेऊन हा चित्रकार तडक राजस्थानात गेला, अन् तेथील लोक, तेथील प्राचीन वास्तू आणि तेथील जानपद कलेचे आविष्कार अत्यंत लयबद्ध पद्धतीने त्यांनी आपल्या कचकड्याच्या पट्टीत बंदिस्त केले.

हुसेन यांच्या चित्रपटात प्रतीकांसारखा वापर केलेल्या काही वस्तू मधूनमधून दिसत राहतात. एक कंदील, एक छत्री, एक जोडा ! राजस्थानी जीवनाचे मर्मच जणु त्यानी या नित्योपयोगाच्या वस्तूंचे काही गणित मांडून प्रेक्षकाच्या मनात ठसविले आहे ! परंतु याव्यतिरिक्त डोळ्यात भरतात ती राजपुतांच्या प्रदेशातील माळराने, राणा प्रतापसिंहाच्या शौर्याला साक्षी राहिलेल्या दुर्गांचे भरभक्कम तट, बांधीव घाटांनी वेढलेले विस्तीर्ण तलाव, आणि गोरगरिबांच्या घरांच्या भिंतीवरसुद्धा शोभून दिसणारी घोडेस्वारांची अगर हिंस्त्र श्वापदांची ठसठशीत चित्रे ! अधूनमधून स्वतः हुसेन यानी काढलेली राजस्थानी स्त्री-पुरुषांची चित्रेसुद्धा डोळ्यात भरतात.

छायाचित्रकार आणि संकलक यांच्या कसबामुळे या छोटयाशा चित्रपटात एक अनोखी लय ओतप्रोत भरून राहिलेली आहे. अन् या लयीला सांभाळील, तिला उठाव देईल अशाच प्रकारचे पार्श्वसंगीत फिल्म्स डिव्हिजनचे विजय राघवराव यानी त्याला दिलेले आहे !

हुसेन यांना चित्रपटनिर्मितीचा यत्किंचितही पूर्वानुभव नसताना त्याना एका नव्या क्षेत्रात इतक्या ठामपणे पदार्पण करता आले याचे श्रेय फिल्मस डिव्हिजनचे जां भौनागरी यांचेकडे जाते. काही वर्षांपूर्वी 'खजुराहो', 'राधाकृष्ण' यांसारखे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे अनुबोधपट तयार करून श्री. भौनागरी यानी आपली फिल्म्स डिव्हिजनमधील कारकीर्द गाजविलेली होती. नंतर ते पॅरिसला युनेस्कोमध्ये चित्रपटनिर्मितीचे काम करण्यास निघून गेले. नभोवाणी मंत्री असताना श्रीमती इंदिरा गांधी यानी त्याना पुन्हा प्रमुख सल्लागार म्हणून फिल्म्स डिव्हिजनमध्ये परत आणले.

जुलै महिन्यात बर्लिन येथे भरलेल्या चित्रपट महोत्सवात हुसेन यांच्या "एका चित्रकाराच्या दृष्टिकोणातून" या लघुपटाला गोल्डन बेअर हे सर्वोच्च पारितोषिक मिळाले. त्याची परदेशात खूपच वाहवा झाली. हुसेन यांच्याबद्दल भौनागरींची जी श्रद्धा होती ती फलदायी ठरली. दोन उच्च श्रेणीचे कलावंत एकमेकाना विश्वासात घेऊन काही आगळे असे करू शकतात हे सरकारी संस्थेच्या चौकटीतसुद्धा सिद्ध झाले !

## अमेरिकन विद्यार्थी व चित्रकार !

ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यात दोन उत्कृष्ट प्रदर्शने जहांगीर गॅलरीत भरविण्यात आलेली होती. येथे त्यातील अमेरिकन विद्यार्थ्यांच्या चित्रकलेच्या व शिल्पकलेच्या प्रदर्शनाचाच तेवढा ओझरता परामर्श घेतो.

अत्याधुनिक अमेरिकन चित्रकलेचे एक प्रदर्शन यंदा फक्त दिल्लीतच भरविण्यात आलेले होते. मुंबईकरांना न मिळालेल्या त्या संधीची भरपाई करण्याचे सामर्थ्य आणि विविधता या विद्यार्थी–कलेच्या प्रदर्शनात खास होती. शिवाय हे प्रदर्शन तितकेसे अत्याधुनिक वाटू नये याची अमेरिकन सरकारने खास काळजी घेतलेली दिसत होती.

कलेचे शिक्षण देण्याची फार उत्तम सोय अमेरिकेतल्या बहुतेक सर्वच विद्यापीठांतून आहे. या शिक्षणाच्या अभ्यासक्रमाची आखणी शास्त्रशुद्ध तर असतेच पण शिवाय प्रत्येक विद्यापीठाला जोडून एक समृद्ध चित्रालयसुद्धा असते. येल विद्यापीठात तर एक सोडून चार चित्रालये आहेत ! अर्थात् धनिक अमेरिकन नागरिकांनी दिलेल्या मोठमोठ्या देणग्यांमुळे हे शक्य झालेले आहे.

या शिक्षणसंस्थांच्या दैनंदिन कार्यपद्धतीची नीट कल्पना यावी म्हणून मोठ्या आकाराची बोलकी छायाचित्रेसुद्धा या प्रदर्शनात मांडण्यात आलेली होती.

चित्रे, रेखाटणे आणि शिल्पे अशा तीनशे प्रकारच्या या विद्यार्थी–कलेच्या नमुन्यांमध्ये आपल्या शिक्षणसंस्थांतून क्वचितच दिसणारी प्रगल्भता दिसत होती. खुद्द अमेरिकन चित्रकलेच्या परंपरेला सांभाळणारी चित्रे जशी येथे होती तशीच नवकलेची सुजाण समज दाखविणारी आणि कल्पकतापूर्ण रंगविलास साधणारी चित्रेही होती.

एकंदरीत हे कलाशिक्षणाचे जग आदर्श म्हणून आपण त्याहाळावे, जवळ करावे इतके उद्बोधक होते.

## थिएटर ग्रुपचे 'बेडरुम'

सहसा मराठी प्रेक्षक मुंबईत होणाऱ्या इंग्रजी नाटकांना उदार आश्रय देण्याची टाळाटाळ करतो. इंग्रजी नाटके करणाऱ्या हौशी लोकांच्या काही नाणावलेल्या संस्था या शहरात आहेत, परंतु त्यांच्याशी मराठी माणसांचा संपर्क कमीच ! अर्थात् यावर जर कोणी विचारले की ते गावठी साहेब तरी आमची मराठी नाटके पाहायला कुठे येतात, तर या प्रश्नाला मजकडे उत्तर नाही ! फक्त एवढेच म्हणता येईल की अभिनयाच्या बाबतीत नसले तरी नेपथ्याच्या आणि प्रकाशयोजनेच्या टापटिपीबाबत आपण या प्रयोगांपासून बरेच काही शिकण्यासारखे असते !

थिएटर ग्रुप ही मुंबईत गेली वीसएक वर्षे इंग्रजी नाटके सादर करणारी संस्था. अलिकडे तिचे सूत्रधार अलीक पदमसी यानी थिएटर वर्कशॉप नांवाचा एक नाटयशिबिरवजा कार्यक्रम दर वर्षी हाती घ्यायला सुरुवात केलेली आहे. आपल्या राज्यसरकारच्या (आणि परवा मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या कलामंडळाने नव्यानेच सुरू केलेल्या) नाटयशिबिरात अन् या वर्कशॉपमध्ये मुख्य फरक हा की वर्कशॉपमध्ये भाग घेणाऱ्या एखाददुसऱ्याच्या हातूनच एक नाटक लिहून घेतले जाते अन् ते बसवीत असतानाच शिबिरात नाटयशिक्षण दिले जाते !

या उपक्रमानुसार सादर झालेले तिसरे नाटक '**बेडरूम**' हे अलिकडेच पाहायला मिळाले. वर ज्यांचा उल्लेख केला आहे त्या श्री. भौनागरींची पत्नी फ्रीनी भौनागरी व सौ. झरीना सायानी यानी वर्कशॉपचे व नाटयप्रयोगाचे दिग्दर्शक यांच्या साह्याने–आणि वेळीप्रसंगी संबंधित नटवर्गाशी विचारविनियम करून–हे उपहासात्मक नाटक लिहिलेले आहे.

हे दोन अंकी छोटेखानी नाटक एका वातानुकूल शयनगृहाच्या सेटवर सादर केले जाते. पिछाडीला वरून खाली सोडायचे चटईचे चार पडदे आहेत; एका अंगाला ड्रेसिंग टेबल आहे अन् चहासाखरेचे डबे बंदोबस्तात ठेवण्यासाठी एक मोठाली पेटी आहे. ऐसपैस मंचकावर डनलॉपिलोच्या मऊ गादीवर उशांची लयलूट आहे तशाच उबदार रजया आहेत. शेजारी टेलिफोन !

एक गलेलठ्ठ, श्रीमंत व सुखासीन गृहदेवता नाटकभर या मंचकावर आराम करताना आपल्याला दिसते. शिरीन छगला या नवोदित नटीने ही भूमिका कसलाही संकोच न बाळगता केलेली आहे. समाजाला जिच्या सुबत्तेचा आणि स्वास्थ्याचा काडीइतकाही उपयोग नाही अशा या बाईचा खादाडपणा, थिल्लरपणा आणि बोलभांडपणा नाटककर्तीनी मजेदारपणे रंगविलेला आहे. आपल्या भोवतालच्या समाजात दिसणारे चित्र इतक्या नेमकेपणे रंगमंचावर उभे करण्याचे मराठी रंगभूमीला नेहमीच जमते असे नाही. (वसंत कानेटकरांचे 'लेकुरे उंदड जाली' हा एक अपवाद–वजा, उपहासगर्भ नाटयाचा लक्षणीय नमुना !)

'बेडरूम'मधले नाटय रंगत जाते ते दुसऱ्या अंकात; ती श्रीमंत बाई ज्या प्रकारे आपल्या एका जीवश्चकंठश्च मैत्रिणीचा कबजा घेते आणि तिलाही आपल्या निष्क्रीयतेच्या जाळचात ओढते तो प्रकार नावीन्यपूर्ण आहे. हा दुसरा अंकच या नाटकाला विचक्षण दृष्टीने केलेल्या मनोविश्लेषणाच्या पातळीवर नेऊन सोडतो.

आहे की नाही थिएटर वर्कशॉपच्या सांघिक नाटयनिर्मितीपासून आपण काही शिकण्यासारखे ?.

**–ज्ञानेश्वर नाडकर्णी**

## 'सोन्याची खाण'

सौ. शिरीष पै ह्या कथाकार, कवि म्हणून मराठी वाचकांच्या चांगल्याच परिचयाच्या आहेत. आचार्य अत्रे यांच्या पावलावर पाऊल टाकून आता त्या नाटयक्षेत्रातही पदार्पण करीत आहेत ही गोष्ट स्पृहणीय होय. 'नाटक होते' असे म्हणतात. सौ. शिरीष पै यांना आता नाटक झाले आहे. एका स्त्रीची व्यथा "घायलकी गति घायल जाने" ह्या न्यायाने त्यांनी 'सोन्याची खाण' ह्या नाटकात व्यक्त केली आहे. हे नाटक स्वतंत्र नसले तरी हे रुपांतर मात्र 'अस्सल भारतीय' वाटावे इतपत स्वतंत्र आहे. 'हे रूपांतर आहे' असे सांगितले नसते तर न कळण्याइतपत ते स्वतंत्र राखण्यात सौ. पै ह्या यशस्वी झाल्या आहेत. वातावरण, संवाद, वागणे ह्यातून परकीय स्पर्श कुठेही जाणवत नाही, हे प्रथमदर्शनी वैशिष्टय म्हणून सांगायला हरकत नाही. हे वातावरण निर्माण करण्यासाठी 'मातीची जात' पूर्ण परिचित असावी लागते. तशी ती सौ. शिरीष पै ह्यांना परिचित आहे ह्याचा परिचय ह्या त्यांच्या पहिल्याच नाटयकृतीत येतो. भावी यशाची पावती ही मराठी (भारतीय) माती देईलसे वाटते.

डॉक्टर जयसूर्य व त्यांच्यावर उत्कट प्रेम करणारी त्यांची मुलगी गायत्री ह्यांच्या ह्या कथेत तिच्या पैशावरच प्रेम करू पाहणारा प्रयाग येतो. आपल्या बापावरही तिचे प्रेम आहे. पण प्रयागशी लग्न करण्याला जेव्हा ते विरोध करतात (त्यांची कारणे व्यावहारिक व खरीही असतात हे तिला नंतर पटते) तेव्हा स्वतःच्या उत्कट प्रेमापायी ती पित्याचे छत्र आणि पैसाही लाथाडायला तयार होते. पण 'सोन्या'साठी गायत्री हे गणित मनोमन मानणाऱ्या प्रयागचे पितळ उघडे पडते. आणि मग त्या 'भयानक' अनुभवातून सावरलेली गायत्री ह्या ऐहिक विचारातून 'मुक्त' होते असे उत्कट कथानक ह्या नाटकाला लाभले आहे.

भाषिक चमत्कारांचा सोस ह्या नाटकात नाही. (नव्यांना हा






मोह आवरत नाही म्हणून पैंचे अभिनंदन) इथे लक्ष दिले गेले आहे ते व्यक्तिरेखांवर. त्यामुळे भाषिक चमत्कार नसले तरी खंत वाटत नाही. 'गायत्री'ची व्यक्तिरेखा दीर्घकाळ स्मरणात राहील अशीच रेखाटली आहे. तिचे भावदर्शन, मनांतल्या खंती – आनंद, सारे काही 'सजीव' होते. ते भावदर्शन लीला मेहता यांनी घडविलेही समर्थपणे. डॉ. जयसूर्यांच्या व्यक्तिरेखेला स्वत:चा असा एक 'ग्रेस' आहे. 'तोल' आहे. लय आहे. दत्ता भट ह्यांना ती सापडली आहे. तोल साधला आहे.

"सोन्याची खाण" ह्या नाटकाचे दिग्दर्शनही सौ. शिरीष पै यांनीच केलेले आहे. आनंद पै यांचे कलात्मक नेपथ्य नाटकाला लाभले आहे. नाटकाचा प्रयोग 'रंगता' ठेवण्यात दिग्दर्शिका यशस्वी झाल्या आहेत. 'पहिले पाऊल' नव्या अपेक्षा निर्माण करण्यात यशस्वी झाले आहे, येवढेच तूर्त म्हणतो. सौ. शिरीष पै यांचे मन:पूर्वक अभिनंदन !

**–बन्याबापू**

---

**[ पान १० वरून-- गंधर्व युग ]**

हे त्यांना माहीतच नाही. द्रौपदी नाटकातल्या विदुराला किंवा मयासुरालासुद्धा त्यांनी जरीच्या कपड्यांनी सजवून टाकले आहे.

. . . . . कंपनीतील भोजनाची व्यवस्था तर फारच वाखाणण्यासारखी असते. थोडी अतिशयोक्ति वाटेल, पण अगदी खरे लिहावयाचे म्हणजे कंपनीतील जेवण इतके चांगले असते कीं मोठमोठ्या सरदारदरकदाराना सुद्धा ते पाहून आश्चर्य वाटेल. लहानापासून मोठ्यापर्यंत सगळ्यांना सारखे भोजन असते. पंक्तिप्रपंच केलेला श्री. नारायणरावाना मुळीच आवडत नाही."

बालगंधर्वांच्या त्यांच्या लोकोत्तर गुणांवर लुब्ध होऊन जनताजनार्दनाने त्यांच्यावर सतत पैशांचा पाऊस पाडला. कंजूषी करून द्रव्यसंचय न करता रंगभूमीच्या सेवेत तो त्यानी सारा पैसा उदार हाताने खर्च केला. रंगभूमीचे वैभव वाढविले आणि बरोबरीच्या कलावंतांच्या प्रपंचाची नीट नेटकी काळजी घेतली.

## गंधर्वयुगाची खास वैशिष्ट्ये

बालगंधर्वांचे महाराष्ट्रावर फार मोठे ऋण आहे. मराठी रंगभूमीच्या उज्ज्वल कीर्तीचा झेंडा त्यानी भारतामध्ये ऊंच फडकवत ठेवला हे तर खरेच परंतु बालगंधर्वांनी महाराष्ट्रातील स्त्रीला कुलीन स्त्रीने शृंगार कसा करावा याचे धडे दिले. पुरुषांना रसिकता आणि सौंदर्यदृष्टि देऊन कायमचे उपकृत केले. मराठी रंगभूमीच्या इतिहासातील वैभवशाली गंधर्वयुगाने महाराष्ट्राचा चेहेरामोहोरा तरतरीत, टवटवीत केला आणि त्याच्या कलाविषयक आवडीनिवडी उच्च पातळीवर नेऊन सोडल्या. बालगंधर्वांचे महाराष्ट्रावर फार मोठे ऋण आहे.

असा लोकोत्तर अभिनेता शतकाशतकातून एखादाच निर्माण होतो असे म्हटले जाते. कला प्रांतातील एवढा नांवलौकिक मिळविण्याआधी बालगंधर्वांनी आयुष्यभर किती अपार कष्ट घेतले असतील हा मुद्दा विचार करण्यासारखा आहे.

किर्लोस्कर कंपनीत येऊन दाखल झाल्यानंतर पहिल्या भूमिकेचा गाजावाजा होण्यात त्यांच्या आयुष्यातील पाचसहा वर्षे खर्ची पडली होती. उमेदवारीच्या काळातील तळमळीने परिश्रम करीत रहाण्याच्या वृत्तीमध्ये त्यानी पुढेही कधी बदल होऊ दिला नाही. आपल्या ऐन वैभवाच्या कालातही रंगभूमीवर कधी चुकारपणा केला नाही. आपल्या भूमिकेशी एकरूप एकजीव होऊन ते रंगभूमीवर वावरले म्हणून त्यानी केलेल्या भूमिका अमर ठरल्या. त्यांची कलोपासना अमर झाली.

बालगंधर्वांच्या एकदोन आठवणी मुद्दाम सांगून हा लांबलेला लेख पुरा करतो.

"आमचे एक गुजराती मित्र म्हणतात– या बालगंधर्वांने माझे गुजराती नाटक पहायचं बंद केलं बुवा !" असे सांगून विनोदी लेखक श्री. चिं. वि. जोशी आपल्या बालगंधर्वांचे गाणे न आवडणाऱ्या एका नातेवाईकाची हकीकत पुढे सांगतात, "इकडे आमचे श्री. बालगंधर्व द्वेष्टे नातेवाईक ज्या शहरात रहात असत तेथे गंधर्व मंडळीचा मुक्काम गेला. आमचे नातेवाईक श्री. बालगंधर्वांची निंदा पूर्वीसारखीच करून मुद्दाम त्यांच्या नाटकास जात नसत. परंतु एके दिवशी त्यांच्या मित्रमंडळीने त्यांस ओढून नेले. मानापमान नाटक होते. प्रथम कंटाळल्यासारखे व रागावल्यासारखे करून त्यानी डोळे मिटून पेंगल्याचे सोंग केले. परंतु भामिनीचे पहिले पद ऐकून ते जागे झाले व मित्रमंडळीने, "काय जोशी बुवा– कसं काय म्हणतो ? सायंटिफिक आहे की नाही ?" असे विचारल्यावर ते म्हणाले, "बरं आहे. सायंटिफिक नाही पण तालसूर चुकला नाही." दुसरे पद झाल्यावर ते माना डोलावू लागले व तिसऱ्या पदाच्या शेवटी जोराने टाळ्या वाजवून त्यानी "वन्स मोअर" दिले. नाटक संपल्यावर ते खेदाने उद्गारले, "विनाकारण मी याला नांव ठेवून चांगल्या गाण्याला आजपर्यंत मुकलो !"

दुसरी आठवण उरणच्या रा. वि. मराठ्यांची आहे. ते म्हणतात, "आमचे वडील आज ८४ वर्षांचे आहेत. त्यांनी आमच्या लहानपणी श्री. बालगंधर्वांविषयी एक आठवण सांगितली. ते फार वर्षांपूर्वी करुणेश प्रिंटिंग प्रेसचे मालक कै. हरीभाऊ गोगटे यांजकडे गेले होते. कै. हरीभाऊंचे श्री. गंधर्वांवर उत्कट प्रेम असे. कंपनी मुंबईस असली म्हणजे हरीभाऊंचे सीझन तिकिट ठरलेले. हरीभाऊ वडिलांस म्हणाले, "बुवा चला गंधर्वांच्या नाटकास जाऊ." तेव्हा वडील त्यांस म्हणाले, "अरे, आम्ही भाऊराव कोल्हटकराचा स्त्रीपार्ट पाहिला आहे. त्यापुढे गंधर्वाच्या गोष्टी नकोबा सांगू !" हो ना करताना फ्रंट सीटला ते दोघे जाऊन तर बसले ! त्या दिवशी नुकतेच रंगभूमीवर आलेले स्वयंवर नाटक होते. ते नाटक पहात असता प्रथमच ज्या वेळेस श्री. बालगंधर्व स्टेजवर टाळ्यांच्या कडकडाटात बाहेर आले त्या वेळेस त्यांस पाहून ते म्हणाले, 'हरीभाऊ हा अमृताचा कलशच मृत्यूलोकात आल्यासारखा वाटत आहे. आपण तर बुवा अगदी स्वर्गसुखात आहोसे वाटते !' मुंबईहून घरी आल्यावर नाटकाचे वर्णन करून सांगताना प्रत्येक वेळी ते तेच वाक्य अभिमानाने उच्चारीत असत.". . . . .

★★

तो अमृतकलश काळाने आपणाकडून आता कायमचा हिरावून घेतला आहे.

आता उरल्या आहेत स्मृती.

त्या स्मृतींचा सुगंध मात्र असाच अनंत कालपर्यंत दरवळत रहाणार आहे.

● ● ●





# नवीन!

## टिनोपालचा 'इकॉनमी पॅक'




टिनोपाल आतां नवीन 'इकॉनमी पॅक' मध्यें मिळतें. यामुळें कपड्यांना पांढराशुभ्र उजळा देण्याला आतां पहिल्यापेक्षां कमी खर्च येईल. आजच एक पॅक खरेदी करा नि पहा — एकच पॅक अनेक दिवस पुरेल आणि पैशांची बचत होईल ती निराळीच ! कुटुंबांतील सर्वांच्याच सफेद कपड्यांना पांढराशुभ्र उजळा देण्यासाठीं शास्त्रशुद्ध 'व्हाइट्नर' टिनोपालच नेहमीं वापरा. अगदीं थोडेसें (चहाचा पाव चमचा) टिनोपाल बादलीभर कपड्यांना पांढराशुभ्र उजळा देण्यास पुरेसें होतें.

**सर्वोत्तम शुभ्रतेसाठीं—टिनोपाल**

**तीन प्रकारच्या पॅकमधून कोणतेंहि निवडा :**



'एक बादलीसाठीं एक पॅकेट'




'रेग्युलर पॅक'




'नवीन इकॉनमी पॅक'



® टिनोपाल हा जे. आर. गायगी एस्. ए. बाल स्वित्झर्लंड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे.

सुहृद गायगी लिमिटेड, पो. बॉ. बॉक्स ९६५, मुंबई - १ बी आर.

shilpi sgt 27a/67 mr

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment SEPTEMBER 1967





COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY-4.










अनुक्रमणिका